शालेय प्रकाशन ६

# इंद्रधनुष्य

(निवडक सात कथांचा संग्रह)

संपादक

वि. स. खांडेकर

किंमत सव्वा रुपया

# अनुक्रमणिका

## आमचीं पांच शालेय प्रकाशनें

**१ काव्यज्योति** किंमत सव्वा रुपया.

नामांकित कवींच्या एकूण सत्तावीस कविता या संग्रहांत आहेत. कविता निवडतांना हें पुस्तक शालेय व्हावें आणि प्रत्येक कवीची चांगली कविता त्यांत यावी अशी दक्षता घेतलेली आहे. प्रत्येक कवितेला श्री. वि. स. खांडेकर यांनीं परिचय लिहिलेला आहे.

**२ नवे किरण** किंमत सव्वा रुपया.

काणेकरांच्या वीस निवडक लघु-निबंधांचा हा संग्रह श्री. वि. स. खांडेकरांनीं संपादित केला असून, दुय्यम शाळांतल्या वरच्या वर्गांतल्या विद्यार्थ्यांना स्थूल वाचनाला उपयुक्त व्हावा म्हणून त्यांनीं प्रत्येक निबंधाला परिचय व अभ्यास जोडला आहे. शिवाय खांडेकरांची सोळा पृष्ठांची प्रस्तावना.

**३ मुक्या कळया** किंमत सव्वा रुपया.

कवठेकरांच्या सात गोष्टींचा संग्रह. संपादक : वि. स. खांडेकर. 'नवे किरण' प्रमाणें हा संग्रहही अभ्यास, परिचय व प्रस्तावना यांची जोड देऊन विद्यार्थ्यांना उपयुक्त व्हावा अशा रीतीनें खांडे-करांनीं संपादित केला आहे.

**४ अग्निनृत्य** किंमत सव्वा रुपया.

कै. शिवरामपंत परांजपे यांच्या तेजस्वी वाङ्मयांतून श्री. खांडेकरांनीं आठ निवडक लेखांचें हें पुस्तक विद्यार्थ्यांसाठीं संपादन केलें आहे. खांडेकरांनीं पुस्तकाला प्रास्ताविक व प्रत्येक लेखाला परिचय लिहिला आहे. त्यामुळें शिवरामपंतांच्या लिखाणाचे सर्व विशेष विद्यार्थ्यांच्या लक्षांत येतील.

**५ गुदगुल्या** किंमत सव्वा रुपया.

कोल्हटकर-गडकऱ्यांनीं मराठी वाङ्मयांत स्वतंत्र विनोदाची प्रभावी परंपरा सुरू केली. या परंपरेचा विकास चिंतामणराव जोशी यांच्या विनोदांत आढळून येतो. त्यांच्या विविध व विपुल लिखाणांतून निवडलेल्या या सहा विनोदी प्रकरणांत त्यांच्या प्रतिभेचे सर्व पैलु प्रगट झाले आहेत. खांडेकरांची वीस पृष्ठांची प्रस्तावना, परिचय व अभ्यास यांची जोड.

# प्रास्ताविक

## १

कथा हाच साहित्यातला काव्याइतका प्राचीन विभाग आहे. आपल्या वैदिक वाङ्मयांतल्या अनेक लहान लहान कथा सुप्रसिद्ध आहेत. त्यांतल्या कांहीं रूपककथा आहेत, कांहीं बोधकथा आहेत, कांहीं जीवनकथा आहेत. बायबलमधल्या 'रूथ', 'प्रॉडिगल सन्' वगैरे छोट्या गोष्टीही अशाच अनेक शतकें लोकांचें कलापूर्ण रीतीनें उद्‌बोधन करीत आल्या आहेत. बुद्धाच्या जातककथांची लोकप्रियताही कांहीं या गोष्टींपेक्षा कमी नाहीं. मानवजात जगात निर्माण झाल्यापासून माणसें मोठ्या उत्सुकतेनें गोष्टी सांगत आणि ऐकत आलीं आहेत रानावनांतल्या शेगोटीभोंवतीं, बाजारांतल्या एखाद्या बैठकीच्या अड्ड्यावर, देवळात आणि धर्मशाळात, सोबतीनें प्रवास करणाऱ्या प्रवाशांच्या तांड्यांत, कथा सांगणारा कुठेंही असो, त्याला श्रोत्यांची वाण कधींच पडत नसे. आजही आगगाडीपासून खाजगी बैठकीपर्यंत मानवी मनाच्या कथालोलुपतेचा अनुभव आपल्याला हरघडी येतो. स्वैर गप्पागोष्टींच्या ओघांत बोलणारा एखाद्या व्यक्तीची जीवनकथा सांगायला लागूं द्या. आपण लगेच कान टवकारून ती ऐकूं लागतों. लहान मुलें घरोघर गोष्टीसाठीं नेहमीं हट्ट धरून बसतात हें तर आपण नित्य पाहतोंच. पण या बाबतींत सारीं माणसें लहान मुलेंच असतात असें म्हटलें तरी चालेल. गोष्ट ऐकण्याची किंवा वाचण्याची आवड ही मानवी रक्तांत अगदीं भिनून गेली आहे. ती मनुष्याची एक प्रकारची भावनात्मक भूक आहे. कथेइतका सर्वस्पर्शी वाङ्मयप्रकार दुसरा कुठलाच नाहीं. त्यामुळेंच मानवाबरोबर तिचा जन्म झाला आणि त्याच्या जोडीनेंच तिचाही विकास होत चालला आहे.

मात्र जिला आपण सध्या लघुकथा म्हणतों तिची वाढ अगदीं अलीकडे—गेल्या शतकांतच—झाली आहे. रूपककथा, बोधकथा, ध्वनिकथा, प्राणिकथा, लोककथा, परीकथा, अद्भुतरम्य कथा, इत्यादि विविध रूपांनीं प्राचीन काळीं सर्व

देशांत विपुल कथावाङ्मय निर्माण झालें. त्यांतलें इसापनीति, पंचतंत्र, हितोपदेश, अँडरसनच्या परीकथा, अरबी भाषेंतल्या सुरस गोष्टी, इत्यादि सुंदर साहित्य शतकानुशतकें कालसागरावरून डौलानें प्रवास करीत आपणांपर्यंत येऊन पोंचलें आहे.

मानवजातीच्या बाल्यावस्थेंत कथेचा असा विकास झाला. पण पुढें तिची प्रगति खुंटली. काव्य, नाट्य, कादंबरी, वगैरे वाङ्मयप्रकाराना या कालखंडात महत्त्व आलें. साहित्यांतला एक स्वतंत्र कलाप्रकार या दृष्टीनें एकोणिसाव्या शतकांतच कथेकडे पुन्हां कलावंतांचें लक्ष वळलें. तिचे नवनवीन उन्मेष दिसूं लागले. पो, मोपाँसा, चेकॉव्ह, टॉलस्टॉय, इत्यादि पाश्चात्त्य प्रतिभाशाली लेखकांनीं आधुनिक वाङ्मयांत तिला मानाचें स्थान मिळवून दिलें.

मराठींतही असेंच घडलें. १८५० ते १९०० या काळात मराठींतल्या वाङ्मयाच्या बहुतेक शाखा पल्लवित झाल्या. पण त्यांत कथेची मात्र गणना करता येणार नाहीं. कादंबरीच्या मानानें गोष्ट त्या वेळीं फार दुय्यम दर्जाची गणली जाई. कुणीही कलावंत अथवा विचारवंत लेखक आपल्या आत्म्याच्या आविष्काराचें एकमेव साधन म्हणून तिच्याकडे या काळांत वळला नाहीं. हरिभाऊ आपटयांची ‘ करमणूक ’ व काशीनाथ रघुनाथ मित्राचें ‘ मासिक मनोरंजन ’ या दोन नियतकालिकांनीं मध्यम वर्गातल्या वाचकांत गोष्टी-विषयीं गोडी निर्माण केली, नाहीं असें नाहीं. पण त्या वेळच्या कथालेखकाचा मुख्य हेतु मनोरंजन हाच होता. एक स्वतंत्र आणि नाजूक वाङ्मयप्रकार म्हणून कथेकडे लक्ष देण्याची आवश्यकता त्या वेळीं कुणालाच भासली नाहीं. १९२० पूर्वींच्या या कालखंडांत हरिभाऊ आपटयाप्रमाणें विठ्ठल सीताराम गुर्जर, कृष्णाजी केशव गोखले, सहकारी कृष्ण, वाग्भट नारायण देशपांडे, वगैरे विविध प्रवृत्तींच्या अनेक लेखकांनीं कथा-लेखन केलें. या सर्वांत वैचित्र्य व विपुलता या दृष्टींनीं गुर्जर अग्रेसर ठरतील. पण गुर्जरांचा बंगाली भाषेशीं चांगला परिचय असूनही त्यांनीं ज्यांच्या कथा आदर्श म्हणून स्वतःपुढें ठेवल्या आणि त्यांतल्या कांहीं मराठींत अनुवादितही केल्या ते प्रभातकुमार मुकर्जी हे नर्मविनोदानें नटलेल्या संसारी कथा आणि गोड गमतीदार गोष्टी लिहिणारे साहित्यिक होते.

रवींद्रनाथांच्या ‘ काबुलीवाला ’ सारखी जीवनाचें उत्कट दर्शन घडविणारी,

किंवा कथा ही कवितेची बहीण आहे याचा वाचकाला प्रत्यय आणून देणारी गोष्ट प्रभातबाबूंच्या लेखणींतून कधींच उतरली नसावी.

लघुकथेच्या विकासाला तो काळच प्रतिकूल होता. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, शिवराम महादेव परांजपे, नरसिंह चिंतामण केळकर, वामन मल्हार जोशी, वगैरे साहित्याच्या इतर क्षेत्रात पहिल्या प्रतीचें यश मिळविणाऱ्या लेखकांनीं त्या काळीं मधून मधून हौसेनें कथा-लेखन केलें. त्यांच्या गोष्टी आज आपण वाचूं लागलों म्हणजे कथाक्षेत्रात त्यांनीं आपली बुद्धि चालविली; पण तिथें त्यांना आपला आत्मा प्रगट करता आला नाहीं, असें वाटल्यावांचून राहत नाहीं. कोल्हटकरांची 'गरीब बिचारें पाडस,' केळकरांची 'माझी आगगाडी कशी चुकली?' परांजप्यांची 'मदनदहन' इत्यादि गोष्टींत त्या त्या लेखकाचे वाङ्मयगुण अंशतः प्रतिबिंबित झाले आहेत यात शंका नाहीं. पण त्यांच्या कुठल्याही कथेंत जीवनाचें सुंदर, संपूर्ण आणि उत्कट असें दर्शन नाहीं.

आधुनिक पद्धतीची लघुकथा मराठींत उदय पावली ती १९२० नंतर! दिवाकर कृष्ण हे या नव्या पद्धतीनें प्रभावी गोष्टी लिहिणारे पहिले कथाकार होत.

## २

गेल्या दोन तपातच मराठी लघुकथेचा क्रमशः विकास होत गेला. अजून अनेक नवे नवे प्रदेश तिनें पादाक्रांत केले पाहिजेत हें खरें आहे. पण आहे या स्थितींतही ती हिंदी, गुजराथी, तामिळ, इत्यादि भाषातल्या लघुकथेपेक्षां कोणत्याही दृष्टीनें कमी दर्जाची नाहीं. जागतिक लघुकथावाङ्मयात ज्यांना मानाचें स्थान मिळेल अशा, अगदीं थोड्या का होईनात, गोष्टी आपल्याकडे लिहिल्या गेल्या आहेत. मराठी लघुकथेच्या या विकासाला वीसपंचवीस लेखकांनीं तरी आपापल्या परीनें हातभार लावला आहे. ती सौंदर्ययुक्त व परिणामकारक व्हावी म्हणून या कलावंतांपैकीं कित्येकांनीं पद्धतशीर प्रयत्नही केले आहेत. याचा अर्थ लघुकथालेखनाचे कांहीं निश्चित नियम आहेत व ते कसोशीनें पाळले कीं सरस गोष्ट निर्माण करता येते असा मात्र मुळींच नाहीं. लघुकथेचें तंत्र हा शब्द अलीकडे आपण वारंवार ऐकतों. 'लघुकथा कशा लिहाव्यात ?' या विषयावर आपल्याकडे लहानमोठे

पुस्तकेंही निर्माण झालीं आहेत. नवशिक्या लेखकांना आणि बहिर्मुख वाचकांना अशा पुस्तकांतल्या सूचनांचें मोठें आकर्षण वाटतें त्यांत सांगितलेले सिद्धांत ते वेदवाक्यांप्रमाणें मानूं लागतात. या सर्व पुस्तकी नियमांचें काटेकोर पालन केलें म्हणजे आपण चांगले लघुकथा-लेखक होऊं किंवा सुंदर लघुकथेचा मोठया रसिकतेनें आस्वाद घेऊं अशी ते आपली कल्पना करून घेतात. पण पाकशास्त्रावरल्या पुस्तकांतल्या निरनिराळे पदार्थ करावयाच्या क्रिया वाचून एखादी बाई कांहीं सुगरण होऊं शकत नाहीं. प्रवासाचीं सचित्र रसाळ वर्णनें वाचून ज्याप्रमाणें कुणी भव्य आणि उदात्त दृश्यातलें सौंदर्य अनुभवूं शकत नाहीं, त्याप्रमाणें लघुकथा-लेखनाचे बाह्य नियम पाळून कांहीं कुणी प्रभावी गोष्टी लिहूं शकत नाहीं.

तंत्राचें महत्त्व वाङ्मयात मुळींच नाहीं असें नाहीं. पण एखाद्या बड्या मनुष्याच्या घरचा नोकर आपल्या साहेबाचे कपडे अंगावर चढवून मिरवूं लागला म्हणून त्याचें कर्तृत्व त्याच्या अंगीं थोडेंच येणार आहे? वाङ्मया-तल्या नियमाचेंही तसेंच आहे. हे नियम अनुभवावरून बनविलेले असतात हें खरें! पण स्वभावतः ते निर्जीव असतात. कापड दुकानांच्या दारात थिजलेल्या डोळ्यांची व निस्तेज वर्णाची एक तरुण स्त्रीची आकृति उंची सुंदर पातळ नेसवून प्रदर्शनाकरितां उभी केलेली असते. केवळ तंत्रावर दृष्टि ठेवून लिहिली जाणारी लघुकथा त्या बाईसारखी भासते. भारी किंमतीच्या पातळाचें सौंदर्य खरीखुरी तरुणी तें नेसून रस्त्यानें जाऊं लागली म्हणजेच प्रगट होतें. त्याचा रंग, त्याचे कांठ, हालचालीमुळें त्याच्यांत निर्माण होणारा सजीवपणा यांच्यामुळें तें आपल्याला आकर्षक वाटूं लागतें. लघुकथेच्या किंवा दुसऱ्या कुठल्याही कलाप्रकाराच्या नियमांच्या बाबतींत हाच अनुभव नेहमीं येतो.

असें असूनही लघुकथेच्या तंत्राचें किंवा तिच्या बाह्यांगाचें वाङ्मयांत स्तोम माजविलें जातें. याचें कारण एकच आहे—साहित्यांतला तो सर्वांत जास्त मागणी असलेला माल आहे. त्यामुळें तो एक अत्यंत अवघड असा कलाप्रकार आहे इकडे लहानमोठया सर्वच लेखकांचें दुर्लक्ष होतें.

लघुकथा सामान्यतः मासिकांकरितां घाईघाईनें लिहिल्या जातात. त्यामुळें न कळत त्यांना एक प्रकारचें यांत्रिक, कृत्रिम आणि निर्जीव स्वरूप प्राप्त होत असतें. अनेक संपादकांना चांगली लघुकथा कशाला म्हणावें हेंही

पुष्कळदां कळत नाहीं. त्यामुळें एका ठराविक ठशाच्या साचेबंद गोष्टी निर्माण होऊं लागतात. सर्व सामान्य वाचकाची अभिरुचि स्वभावतः उथळ असते. अशा पुष्कळशा गोष्टी घटकाभर करमणुकीकरितां वाचायची त्याला संवय झाली म्हणजे सजीव कलापूर्ण लघुकथा आणि निर्जीव साचेबंद लघुकथा यातलें अंतर जाणण्याची त्याची शक्ति बधिर होते. पण या महिन्याला प्रसिद्ध होऊन पुढल्या महिन्याला विसरल्या जाणाऱ्या अशा असंख्य गोष्टींवरून लघुकथेच्या सौंदर्याची, सामर्थ्याची, किंवा कलापूर्ण स्वरूपाची कल्पना करून घेणें अत्यंत चुकीचें ठरेल.

जातिवंत लघुकथा लेखक हा खरा कलावंत असतो. बाह्य नियमांपेक्षां, साहित्यांतल्या संकेतांपेक्षां किंवा कृत्रिम रीतीनें जुळविल्या जाणाऱ्या कथानकापेक्षां आपल्या स्वतःच्या भावनांचा आणि विचारांचा आविष्कार करणें, जीवन व्यक्तिगत दृष्टिकोनांतून जाणून घेणें आणि ती जाणीव प्रामाणिकपणें प्रगट करणें, हें आपल्या कलेचें खरें कार्य आहे याची त्याला पुरेपूर कल्पना असते. या दृष्टीनें त्याचें कवीशींच साम्य आहे पद्यरचनेवरलें प्रभुत्व साध्य झाल्यामुळें एखादा कवि उठल्यासुटल्या कविता रचूं लागला तर त्याच्या त्या भारुडाला काव्य कोण म्हणेल ? भोंवतालीं घडणाऱ्या घडामोडी आणि वावरणारीं माणसें यांचें जसेंच्या तसें चित्रण करणें, किंवा आपली कल्पना आणि भावना यांना विशिष्ट रीतीनें जागृत करणाऱ्या एखाद्या प्रसंगाचें अथवा पात्राचें केवळ यांत्रिक पद्धतीनें चित्रण करणें हें लघुकथा-लेखकाचें कामच नव्हे ! कवीप्रमाणें त्यालाही आपल्या कथेचा विषय कुठें आढळेल याचा नियम नसतो. पण तो विषय त्याच्या अंतःकरणांत फुलावा लागतो, तिथें तो सजीव व्हावा लागतो, त्याच्या व्यक्तिमत्तेनें तो रंगून जावा लागतो. निर्मितीच्या वेदनांशिवाय तिचें सुख कलावंताला कधींच मिळत नाहीं. इथें बनवाबनवीला, जुळवाजुळवीला, कृत्रिम रचनेला किंवा यांत्रिक मांडणीला जागा नाहीं. ज्याची कलाकृति अशा रीतीनें निर्माण होते तो तंत्राचा विचार प्रथमतः मुळींच करीत नाहीं. उलट तंत्रच न कळत त्याच्या मागून धांवत येतें.

## ३

या संग्रहांतली हरिभाऊ आपट्यांची 'डिस्पेप्शिया' ही जुन्या काळांतली गोष्ट पाहिली तरी खऱ्या कलावंताला तंत्र कसें वश होतें हें स्पष्टपणें दिसून

येईल. हरिभाऊंनीं जेव्हां ही गोष्ट लिहिली तेव्हां आधुनिक पद्धतीच्या लघुकथा इंग्रजींत सुद्धा फार थोड्या लिहिल्या जात असत. पाश्चात्त्य वाङ्मयातल्या लघुकथेचा विकास मुख्यतः फ्रेंच, रशियन व अमेरिकन लेखकांनीं केलेला आहे. पण हे कलावंत त्या काळीं आपल्याकडे फारसे माहीत नव्हते. त्यामुळें त्यांनीं केलेल्या नवनवीन प्रयोगांपासून हरिभाऊंना प्रेरणा मिळणें शक्य नव्हतें. कादंबरी-लेखनांत त्यांच्यापुढें स्कॉट, डिकेन्स, थॅकरे, वगैरे आदर्श निश्चित होते. गोष्टी लिहितांना तसा कुठलाही थोर लेखक त्यांच्यापुढें असलेला दिसत नाहीं. किंबहुना गोष्ट हा ललित वाङ्मयांतला एक महत्त्वाचा कलाप्रकार आहे अशा दृष्टीनें त्यांनीं कांहीं विचार केला असेल असेंही वाटत नाही. 'करमणूक' पत्रांत चालू कादंबरीच्या प्रकरणांच्या जोडीनें छोट्या विनोदी चुटक्यापासून लांबलचक गोष्टींपर्यंत निरनिराळ्या प्रकारचा मनोरंजक मजकूर त्याना द्यावा लागे. भरतीचा मालमसाला या दृष्टीनेंच ते कथेकडे त्या वेळीं पाहत असावेत. हें सर्व लक्षात घेतलें म्हणजे 'डिस्पेप्शिया' या गोष्टींत आधुनिक लघुकथेचे अनेक विशेष आढळावेत याचें आश्चर्य वाटल्यावाचून राहत नाहीं. पण तसें पाहिलें तर त्यांत नवल करण्यासारखें तरी काय आहे? बागेतला गुलाब प्रथमदर्शनीं रानांतल्या गुलाबापेक्षां फार सुरेख वाटतो. पण एवढ्यामुळें त्या दोघांच्या सुगंधात मोठा फरक पडतो असें थोडेंच आहे!

'डिस्पेप्शिया' या गोष्टीची मांडणी करतांना हरिभाऊंनीं पात्रें व प्रसंग यांची शक्य तेवढी काटकसर केली आहे. कथेचें केंद्र मनांत निश्चित झालें असल्यामुळें ही गोष्ट त्यांना सहजासहजीं साधली. आपल्याला अग्निमांद्य झालें आहे या भावनेनें पछाडलेल्या कृष्णरावाला स्वतःच्या मूर्खपणाची जाणीव करून देणें हा या गोष्टीचा विषय आहे. त्याला ती जाणीव व्हावी म्हणून घाईमध्यें डॉक्टरांच्या हातून होणाऱ्या पत्रांच्या अदलाबदलीचा उपयोग हरिभाऊंनीं करून घेतला. ही कल्पना गोष्टींतल्या मुख्य रसाला पोषक अशीच आहे. कृष्णरावाच्या वेड्या समजुतीची व शेवटीं त्याच्या होणाऱ्या फजितीची ही गोष्ट असल्यामुळें सारें कथानक या एका मध्यवर्ती पात्राभोंवतीं लेखकानें खेळविलें आहे. गोष्टीचा आरंभ होतो तोच मुळीं असा—

'दामोदर, ए दामोदर, पत्रंबित्रं कांहीं आलीं आहेत कीं नाहींत?'

'नाहीं' असें उत्तर मिळतांच सकाळीं फेरफटका करून आलेले कृष्णराव वकील आपल्या ऑफिसमधील एका ईझिचेअरवर बसले. अलीकडे कृष्णराव अगदीं उदास दिसत असत. त्यांस असें वाटत असे कीं, आपण अगदीं खंगलों आहों व अशक्तही झालों आहों '

गोष्टीच्या आरंभीच्या या पाच ओळींतच आपण तिच्या अंतरंगांत प्रवेश करतों. कृष्णराव बाहेरून फिरून येतांच मोठया उत्सुकतेनें पत्रांची चौकशी करतो. त्यावरून कुठल्यातरी महत्त्वाच्या पत्राची तो वाट पाहत असावा हें उघड दिसतें. तें अपेक्षित पत्र त्याच्या प्रकृतीविषयींचेंच असलें पाहिजे हें त्यानंतरच्या त्याच्या मनःस्थितीच्या वर्णनावरून आपल्या लक्षांत येतें. कृष्णराव आपल्या प्रकृतीविषयीं चिंतायुक्त मनानें विचार करीत बसतो न बसतो तोंच टपाल येतें. त्यांतलें एक ओळखीच्या हस्ताक्षराचें पत्र तो घाईघाईनें हातांत घेतो व लगबगीनें फोडतो. त्यात पुढील मजकूर असतो : 'कळविण्यास फारच वाईट वाटतें कीं ज्या रोगानें आपणांस ग्रासलें आहे असा तुम्हांला आजपर्यंत निव्वळ संशय होता तो रोग खरोखरच तुम्हांला त्रास देत आहे. एवढे दिवसपर्यंत तुम्ही उगीच हयगय केलीत. आतां आपला रोग बराच अनावर झाला आहे.'

भुताच्या हातात कोलीत मिळावें तशी कृष्णरावाची स्थिति होते. 'आता थोडे दिवसांचा तुमचा आमचा संबंध राहिला आहे,' असें बायकोला बजावून तो कपाळाला हात लावून बसतो ! त्यांची पत्नी हवापालट करायची गोष्ट काढते. तेव्हां तो उद्गारतो, 'चांगली न् वाईट आतां सगळीकडे सारखीच हवा आहे आम्हांला ! आतां एकदांच हवा बदलेल म्हणजे झालं.' त्याची समजूत घालण्याकरितां ती म्हणते, 'गणपतरावभाऊजी काहीं असं पत्र लिहायचे नाहींत ! त्यांनीं थट्टा केली असेल इकडची !' त्यावरोबर कृष्णराव वसकन् तिच्या अंगावर येऊन म्हणतो, 'आमच्या सगळ्या जन्माची थट्टा झाली आहे. आम्ही मरून लांकूड होऊन पडलों तरीसुद्धा तुम्हांला वाटणार हा थट्टेनेंच मेलाय् ! तेव्हां देखील सारी मंडळी मिळून माझ्या मढ्याची थट्टा करून हंसा म्हणजे झालं.'

अशा रीतीनें त्रागा करीत, डोक्यांत राख घालून देत आणि बायकोला छळीत तो सारा दिवस आणि रात्र काढतो. दुसरे दिवशीं सकाळीं गणपतराव डॉक्टरांच्याकडून त्याला एक चिठ्ठी येते. कृष्णरावाबरोबरच त्यांनीं दुसऱ्या

एका रोग्याला तपासलेलें असतें. गडबडींत त्या दोघांना पाठवायच्या पत्रांची अदलाबदल झालेली असते. कृष्णरावाला उद्देशून लिहिलेलें जें खरें पत्र असतें त्यांत डॉक्टरांनीं त्याला पुढील सल्ला दिलेला असतो : 'चांगला दोनचार वेळ सांजाबिंजा खाऊन रोज दोनचार मैल रपेट करून येत जा. म्हणजे असल्या मूर्खपणाच्या कल्पनासुद्धा तुझ्या मनांत येणार नाहींत. माझी सगळी डिस्पेन्सरी पिऊं इच्छिणाऱ्या वेड्या पिरा, डिस्पेप्शियाराज, हा नादिष्टपणा आपण लवकर सोडा, नाहींतर आपणाला कुलाब्याकडचें एक विशेष लोकांकरितां बांधलेलें घर दाखवावें लागेल !'

कथेची ही रचना पाहिली म्हणजे एक गोष्ट तत्काळ लक्षांत येते आपल्याला आजार झाला आहे अशी खोटी समजूत करून घेणाऱ्या एका सुशिक्षित वेड्या पिराची गंमतीदार हकीगत आपल्याला सांगायची आहे, ही गोष्ट हरिभाऊंनीं कुठेंही आपल्या नजरेआड होऊं दिली नाहीं. नायकाची फजिती-त्याच्या वेडाची थट्टा हाच गोष्टीचा मुख्य हेतु असल्यामुळें वातावरण पहिल्या-पासून शेवटपर्यंत विनोदी ठेवलें आहे. कृष्णराव पहिलें पत्र हातांत पडल्यावर सारें घर डोक्यावर घेतो. रात्रीं तर तो राधाबाईला सळो कीं पळो करून सोडतो. अशा वेळीं राधाबाई घाबरून गेलेली दाखविली असती तर गोष्टीच्या वातावरणाशीं विसंगत असलेली कारुण्याची छटा निर्माण झाली असती. ती होऊं नये ही दक्षता हरिभाऊंनीं कशी घेतली आहे हें पाहण्यासारखें आहे. कृष्णराव वकील आहे हें त्यांनीं गोष्टीच्या आरंभींच सांगितलें आहे. पण कथेचा ओघ खंडित होईल असें कोणतेंही पात्र या निमित्तानें त्यांनीं क्षणभर सुद्धां गोष्टींत येऊं दिलेलें नाहीं. राधाबाई, गणपतराव व दामोदर कारकून या तीन पात्रांचा परिचय आपल्याला कथेंत होतो. पण तो किती ? अगदीं पुसट. केवळ कामा-पुरता ! कृष्णरावाशीं त्यांचा जेवढा संबंध येतो तेवढ्या पुरतेंच त्यांचें चित्रण ! लेखकाला कृष्णरावाचें मन रंगवायचें आहे, त्याचें वेड सांगायचें आहे, या वेडाची फजिती कशी झाली याचें वर्णन करायचें आहे. म्हणून या विकासाला आवश्यक तेवढाच त्यानें या पात्रांचा व पत्रांच्या अदलाबदलीचा उपयोग करून घेतला आहे.

लघुकथेच्या अद्यावत् तंत्राशीं परिचित असलेल्या कुशल लेखकाकडे ही गोष्ट दिली तर तो त्यांत चारदोन किरकोळ फेरबदलापलीकडे कुठलीही सुधारणा

करूं शकणार नाहीं. ' त्या वेळीं काय झालें तें आतांच सांगण्यांत स्वारस्य नाहीं. सबब तें आतांच न सांगतां पुढील हकीगतीकडे वळूं. ' असल्या वाक्यांतून मध्येंच लेखक गोष्टींत अकारण डोकावत असलेला दिसतो. म्हणून तीं आजकालचा कथालेखक आपल्या गोष्टींत येऊं देणार नाहीं. डॉक्टराचें खरें पत्र कृष्णरावाला मिळाल्यानंतर गोष्ट संपविण्याकरतां हरिभाऊंनी पुढें दोन परिच्छेद लिहिले आहेत. त्यातला दुसरा सर्वच दृष्टींनी अनावश्यक आहे. त्याला आधुनिक लेखक निःसंशय रजा देईल. गोष्टीच्या आरंभीं कृष्णरावाच्या वेडाचा परिचय त्याच्या स्वगत विचारांतून हरिभाऊंनीं करून दिला आहे. १९४८ चा लेखक कृष्णराव व राधाबाई यांच्या संवादांतून त्या सर्व गोष्टी सूचित करील. पण असल्या किरकोळ फेरबदलापलीकडे मूळ कथेला कुठेंही धक्का लावण्याची जरूरी त्याला भासणार नाहीं. याचें कारण एकच आहे. हेतु, मांडणी, भावना, वातावरण या सर्वांची एकरूपता या कथेंत साधलेली आहे. तंत्राच्या ठराविक चाकोरीपेक्षां लेखकाची कथाविषयाशीं होणारी तद्रूपताच सरस गोष्टीच्या निर्मितीच्या दृष्टीनें अधिक महत्त्वाची असते हेंच यावरून सिद्ध होतें.

## ४

मुखठणकर व य. गो. जोशी हे हरिभाऊंच्या नंतरच्या पिढींतले लेखक. या संग्रहांतल्या त्यांच्या ' महापुराची शिकवण ' व ' पारिजातकाचीं फुलें ' या दोन गोष्टींची थोडीशी चिकित्सा केली तरी तद्रूपता किंवा एकाग्रता हाच सरस लघुकथेचा आत्मा आहे हें आपल्या प्रत्ययाला येतें. मुखठणकर व जोशी या दोघांनीही गोष्ट इतकी लांब नि इतकी रुंद असावी, इतक्या वेळांत ती वाचून पुरी व्हावी, तिच्यात पात्रें आणि प्रसंग यांना शक्य तेवढा संक्षेप द्यावा, इत्यादि गोष्टींना अवास्तव महत्त्व देणाऱ्या नियमांचा अवलंब करून आपल्या कथा लिहिलेल्या नाहींत. उलट ' ग्यानबा तुकाराम आणि टेकनिक् ' यासारख्या आपल्या गोष्टींत जोश्यांनीं तंत्राचा यथेच्छ उपहासच केला आहे. असें असूनही ' महापुराची शिकवण ' व ' पारिजातकाचीं फुलें ' या कथा मनाला चटका लावतात.

' महापुराची शिकवण ' या गोष्टींत सांतु वाणी व पावलु या शेजाऱ्या-

शेजाऱ्यांच्या कुटुंबांतल्या सर्व मंडळींचा लेखकानें कथाविकासाला उपयोग करून घेतला आहे. क्षुल्लक कारणावरून भांडणाऱ्या भिन्न धर्मांच्या दोन शेजाऱ्यांची माणुसकी मृत्यूच्या दारांत जागृत होते आणि ते एकमेकांच्या मदतीला धांवून जातात हें दाखविणें हा या कथेचा मुख्य हेतु आहे. पण तेवढ्यासाठीं सांतु शणै व पावलु या दोन कुटुंबांतल्या दोन प्रमुख पुरुषांभोंवतीं संपूर्ण कथा गुंफण्यानें कृत्रिमता निर्माण झाली असती. एकमेकांशेजारीं गुण्या-गोविंदानें नांदणाऱ्या या दोन कुटुंबांत कलहाची पहिली ठिणगी कशी पडते हें दिग्दर्शित केल्याशिवाय कथा लिहिणें हें पायावांचून कळस उभारण्या-सारखेंच झालें असतें. तसें होऊं नये म्हणून सांतु शणैंना सतराअठरा वर्षांचा हिंदुधर्माभिमानी नातू सोनू आपल्या आजोळीं येतो व हिंदुधर्माचा दिव्य संदेश ज्याच्या त्याच्या कानीं कपाळीं ओरडून सांगू लागतो, असें लेखकानें दाखविलें आहे गोष्टीचा पूर्वार्ध या सोनूबाळाच्या लीलांतच खर्च झाला आहे. पण कथेच्या विकासाच्या दृष्टीनें तो आवश्यक आहे. ही कथा केवळ व्यक्तिमनाचें चित्रण करणारी नाहीं. सामाजिक संघर्ष कसे निर्माण होतात, ते किती निराधार असतात आणि संघर्ष हा मानवी जीवनाचा शत्रु आहे, सहकार्य हाच मानवतेचा खरा मित्र आहे, हें सारें केवळ दोन विधर्मी शेजाऱ्यांचीं शब्दचित्रें काढून सूचित होऊं शकलें नसतें. या गोष्टींतलें फुलगाव जिला नेहमीं मोठे पूर येतात अशा एका नदीच्या काठावर वसलें होतें ही गोष्ट कथेच्या पूर्वार्धांत सहज सांगितली गेली असती तर कलादृष्ट्या तें अधिक बरें झालें असतें किंबहुना या कथेच्या विकासामध्यें पहिल्यापासून नदीला महत्त्वाचें स्थान मिळणें आवश्यक होतें, असें कुणी म्हटलें तर तें विचारार्ह ठरेल. पण या गोष्टींत दोन कुटुंबांतल्या अनेक व्यक्तींचें चित्रण आलें आहे, तिच्यांत विविध प्रसंग आहेत, आणि पात्र-प्रसंगांच्या या विपुलतेमुळें तिची परिणामकारकता कमी झाली आहे, असें कुणी म्हणूं लागला तर तें अत्यंत अरसिकपणाचें ठरेल. ही कथा तंत्र-शुद्ध नाहीं हें खरें आहे. पण केवळ परीटघडीचे कपडे घातल्यानें मनुष्य जसा अंतर्यामीं सज्जन बनत नाहीं, त्याप्रमाणें केवळ तंत्रशुद्धतेनें मनाला दीर्घ काल चटका लावणाऱ्या कथा निर्माण होत नाहींत. कथाविषयाची विशा-लता, कथेंतल्या माणसांविषयीं लेखकाला वाटणारा जिव्हाळा, त्याच्या दैनंदिन जीवनाचें त्यानें केलेलें सूक्ष्म निरीक्षण, कथावस्तूकडे पाहण्याचा त्याचा

विशिष्ट दृष्टिकोन, इत्यादि गोष्टी तंत्रापेक्षां अनेक पटींनीं अधिक महत्त्वाच्या असतात. या कथेंत हे सर्व गुण आहेत. म्हणूनच ती वाचून संपविली कीं क्षणभर आपणाला जीवनाचें अंतरंग अगदीं जवळून न्याहाळायला मिळालें, त्यांतल्या छायेप्रमाणें त्यांतल्या प्रकाशाचेंही आपल्याला दर्शन झालें, असा भास होतो. हा दिव्य उत्कट भास हेंच या गोष्टीच्या यशाचें गमक आहे.

५

'पारिजातकाचीं फुलें' ही गोष्टही अशीच आहे. 'समरप्रसंग, रचनाचातुर्य, व्यक्तिदर्शनलाघव, उत्कंठा व विस्मय निर्माण करण्याची शक्ति हे गुण कादंबरींत जसे प्रतीत व्हावयास पाहिजेत तसेच लघुकथेंतही स्पष्ट दिसले पाहिजेत' असें प्रो. फडके प्रतिभासाधनांत म्हणतात. फडक्यांचें हें विधान आपण या कथेला कितपत लागू पडतें हें पाहूं लागलों म्हणजे मन गोंधळांत पडल्यावांचून राहत नाहीं. फडक्यांच्या या चौकटींत ही गोष्ट बिलकुल बसत नाहीं. पण ती वाचल्यावर मनाला चटका लागल्यावांचून रहात नाहीं. फडक्यांच्या सिद्धांताप्रमाणें या कथेंतला समरप्रसंग आपण शोधूं लागलों तर तो शोध कधींच संपणार नाहीं. या गोष्टींत मुळीं कुठलाही महत्त्वाचा प्रसंगच नाहीं. मग तिच्यात समरप्रसंग कुठून येणार ? वाड्याचा मालक व त्याच्या वाड्यांत महा रुपयांची भाड्याची जागा घेऊन रहायला आलेला कृष्णराव यांच्यांत भाड्याविषयीं कांहीं वासघीस झाली असती किंवा कृष्णरावाच्या बायकोनें मधल्या चौकांत केर टाकल्यामुळें तिची आणि दुसऱ्या एखाद्या बाईची थोडी बोलाचाली झाली असती, तर ओढून ताणून का होईना या भांडणाला समरप्रसंग म्हणतां आलें असतें. पण या गोष्टीची उभारणीच मुळीं कृष्णरावाच्या आणि त्याच्या कुटुंबांतल्या मंडळींच्या शांत, अबोल, समाधानी आणि दुसऱ्याला आपल्याकडून काडीचाही उपद्रव होऊं नये अशाविषयीं सदैव दक्ष असणाऱ्या स्वभावावर झाली आहे. अशी सज्जन माणसें भेटल्यावर समरप्रसंग निर्माण होणार तरी कसा ? आणि केव्हां ? गोष्टींत जी कांहीं थोडी चलबिचल होते ती वाड्याच्या मालकाच्या मनांत ! कृष्णरावासारखीं अगदीं सामान्य परिस्थितींतलीं गरीब माणसें इतक्या सुखासमाधानानें कशी नांदतात याचा त्याला मोठा अचंबा वाटतो. नेहमीं कांहीं ना कांहीं कुरकुरींनीं ग्रासलेल्या

आपल्या कुटुंबाचें चित्र त्याच्या डोळ्यांपुढें उभें राहतें. सांपत्तिक स्थिति संपूर्णपणें अनुकूल असूनही ज्यांच्या घरांतली चिरचिर कधीं थांबत नाहीं अशीं इतर अनेक कुटुंबेंही त्याला आठवतात. त्याला अभ्राच्छादित आभाळा-सारखे या कुटुंबांचे आयुष्यक्रम वाटतात. उलट कृष्णरावाच्या कुटुंबांत मात्र सदैव सूर्यप्रकाश हंसत असतो. तिथें काळेकुट्ट ढग नाहींत, अंगाला झोंब-णारे वारे नाहींत, पाय घाणेरडे करून सोडणारा चिखल नाहीं, कांहीं नाहीं. सारें कसें स्वच्छ, मोकळें आणि हंसरें आहे. हें अंतर वाड्यातल्या मालकाला अतिशय जाणवतें, तें त्याच्या मनाला अस्वस्थ करून सोडतें, त्याच्या विवेक-बुद्धीला टोंचणी लावतें. सुख बाह्य उपाधींवर अवलंबून नसतें, मनाच्या समाधानांत, माणसाच्या विवेकशक्तींत त्याचा उगम असतो, हें त्याला पूर्णपणें पटतें. वाड्याच्या मालकाच्या मनातलें हें द्वंद्व हाच या कथेचा महत्त्वाचा भाग आहे; पण तो अगदीं शेवटचा भाग आहे. गोष्ट तिथेंच संपते.

रचनाचातुर्य हा फडक्यांच्या लघुकथेच्या व्याख्येप्रमाणें लघुकथेला अत्यंत आवश्यक असा दुसरा गुण! आरंभ अशा तऱ्हेचा असावा, अखेर तशा तऱ्हेची असावी, कथेंतल्या धाग्यादोऱ्यांची आधीं गुंफण करून, त्या गुंफणीनें उत्कंठा वाढवून, मग ते कसे उलगडून दाखवावेत, वगैरे वगैरे गोष्टी या सदराखालीं येतात. प्रसंगप्रधान लघुकथेला या गुणाची आवश्यकता असते यांत मुळींच संशय नाहीं. पण 'पारिजातकाचीं फुलें' या चिंतनपर गोष्टीला हा रचनाचातुर्याचा नियम लावण्यात कांहींच स्वारस्य नाहीं. या कथेचा आरंभ एखाद्या गुजगोष्टीप्रमाणें स्वैरपणें झाला आहे. वाड्याच्या माल-काची मुलगी लग्न होऊन नुकतीच सासरीं गेलेली असते. तिच्या वियोगामुळें त्याच्या मनाला जी हुरहूर लागलेली आहे तिचें तो तब्बल दोन पृष्ठें वर्णन करतो. कथेच्या या भागांत पहिलीवहिली मुलगी सासरीं पाठविल्यानंतर माता-पित्यांच्या मनांना जो एक विलक्षण अस्वस्थपणा जाणवतो त्याचें सुरस वर्णन आहे यांत शंका नाहीं. पण त्याचा कथेच्या मुख्य विषयाशीं कांहीं संबंध नाहीं. या वर्णनांतल्या कांहीं उपमा मोठ्या मार्मिक आहेत. त्यामुळें आपण कुठें जात आहोंत हें कळत नसूनही वाचक लेखकाबरोबर प्रवास करतांना कंटाळत नाहीं. मनाची ही हुरहूर शांत व्हावी म्हणून हा पिता रात्रीं नऊ वाजल्यापासून तीन वाजेपर्यंत बाहेर भटकत राहतो. पहांटे घराकडे येतांना बोळाच्या कोपऱ्याशीं

फुललेलें एक पारिजातकाचें झाड त्याला दिसतें. या झाडामुळें त्याच्या मनात उद्भवणाऱ्या विचारतरंगात व मुलीच्या लग्नामुळें निर्माण झालेल्या हुरहुरीच्या पुनर्वर्णनांत पुढलीं दोन पानें खर्ची पडलीं आहेत. यानंतर गोष्टींतलें महत्त्वाचें पात्र कृष्णराव त्याच्या वाड्यांत भाड्यानें जागा मिळेल किंवा काय याचा शोध करण्याकरितां येतें. अगदीं साधी सरळ रचना आहे ही.

उत्कंठा व विस्मय निर्माण करण्याची शक्ति हा फडक्यांनीं उल्लेखलेला नियमही कथाप्रधान गोष्टीच्या बाबतींतच विशेष उपकारक ठरणार आहे. स्वभावप्रधान गोष्टींत त्याला विशेष महत्त्व नाहीं. कृष्णरावाचें कुटुंब वाड्यांत रहायला आल्याबरोबरच तीं सारीं माणसें सुशील, संयमी व सुस्वभावी आहेत हें आपल्याला कळतें. त्यामुळें पुढें कथेमध्यें एखादी चित्तवेधक घटना घडेल अशी आपण मुळींच अपेक्षा करीत नाहीं. लेखकही कुठेंच कृत्रिम प्रसंगाचा आश्रय करण्याची धडपड करीत नाहीं. त्याला वाचकाच्या मनावर एकच संस्कार निर्माण करावयाचा असतो. तो म्हणजे कृष्णरावाच्या दरिद्री कुटुंबांतल कधींही भंग न पावणारे सुखाचें आणि समाधानाचें वातावरण हा होय. हें वातावरण निर्माण करण्याकरितां जरूर त्या सर्व गोष्टी तो सांगतो. तें निर्माण झालें असें वाटताच तो थांबतो. त्याचें काम तिथेंच संपतें.

चांगल्या लघुकथेंत जे गुण असले पाहिजेत असें फडके म्हणतात त्यांपैकीं फक्त व्यक्तिदर्शन तेवढें या कथेंत आढळतें. असें असूनही ही कथा परिणामकारक झाली आहे. याचें मुख्य कारण तिच्यांतलें जीवनदर्शन हें होय! माणसें कशावर जगतात याविषयीं लेखकाची एक विशिष्ट श्रद्धा आहे. ती श्रद्धा त्यानें मोठ्या उत्कटतेनें आणि समरसतेने कृष्णरावाच्या द्वारें व्यक्त केली आहे. त्यामुळें ही कथा वाचतांना आपण केवळ एक मनोरंजक गोष्ट वाचीत आहों, असें मनाला मुळींच वाटत नाहीं. ती वाचतां वाचता आपण अंतर्मुख होतों, जीवनाविषयीं विचार करूं लागतों. क्षणभर आपल्या मनाला उत्कटतेचा आणि उदात्ततेचा स्पर्श होतो. पोटापाठीमागें धांवत सुटलेल्या काव्यहीन आणि श्रद्धाशून्य अशा आपल्या आयुष्यक्रमांत अपरिचित असलेल्या जीवनसौंदर्याचें दर्शन आपणाला घडत आहे असें या वेळीं आपणाला वाटतें. वाचकाला जीवनाची अशी उत्कटता जाणवणें, त्याला असा उदात्त भास होणें, हें तंत्रबद्ध रचनेपेक्षां चांगल्या लघुकथेचें अधिक महत्त्वाचें अंग आहे.

# ६

या संग्रहातल्या उरलेल्या तीन गोष्टींवरून लघुकथेच्या आत्मीय गुणाची वाचकांना अधिक स्पष्ट कल्पना येऊं शकेल. रवींद्रांची ' श्रीमती ' ही छोटी कथा एखाद्या लहानशा कहाणीसारखी आहे. जीवनाचा जिव्हाळा आणि विषयाची विशालता हेच अशा लोककथांचे मुख्य गुण असतात. या दोन्ही गुणांचा तीन मिनिटांत वाचून संपणाऱ्या या गोष्टीत मोठा परिणामकारक प्रत्यय येतो. ' मायेचा वारसा ' या सरदेसायांच्या गोष्टीत तर कथानकाला मुळींच महत्त्व नाहीं. एक भटजी एका जमीनदाराकडे येऊन त्याची पडीक जमीन खंडानें मागतो व आपल्या रक्ताचें पाणी करून तिथें मोठी बागाईत उठवितो, एवढेंच तिचें कथासूत्र आहे. तें वाचून कुणीही म्हणेल, ' असे मेहनत करणारे पुष्कळ शेतकरी आम्हीं पाहिले आहेत. पण गोष्ट लिहिण्यासारखें त्यांच्यात काय असतें याची मात्र आम्हांला कल्पना नाहीं. ' कथा-लेखकाच्या कलेच्या कसोटीची हीच जागा आहे. सामान्य माणसाला जी गोष्ट चित्तवेधक असेल असें वाटत नाहीं, ती किती काव्यपूर्ण असूं शकते, याची कल्पना विशिष्ट दृष्टिकोनां-तून आपण त्या वस्तूकडे अथवा घटनेकडे पाहूं लागल्यावरच आपणाला येते. ' हात लावला कीं सोनें ' या अद्‌भुत कथेंत एक राजा आहे. तो ज्या ज्या पदा-र्थाला हात लावतो तो तो त्याचा स्पर्श होताच सोनेरी बनतो. व्यक्तित्वसंपन्न कथा-लेखक तसाच असतो. त्याच्या जादूच्या स्पर्शानें रुक्ष भासणाऱ्या विषयांतून रस पाझरूं लागतात. बाह्यतः कुरूप दिसणाऱ्या गोष्टींतलें अंतःसौंदर्य तोच वाचकाला प्रचीत करून देतो. त्याच्या सान्निध्यांत पूर्वी न दिसलेलें सौंदर्य आपणांला दिसतें, पूर्वी ऐकूं न आलेलें संगीत ऐकूं येऊं लागतें. ही शक्ति पुस्तकी ज्ञानानें किंवा तंत्राच्या अभ्यासानें साध्य होत नाहीं. ती संपन्न आणि संस्कारी अशा व्यक्तित्वांतूनच निर्माण होते. जीवनाकडे पाहण्याच्या उत्कट, प्रामाणिक आणि सहानुभूतिपूर्ण दृष्टिकोनांतून ती जन्माला येते. भावना, कल्पना आणि विचार हीं सर्व द्रवून जाऊन त्यांचे पाझर एक झाले आणि त्या संगमांतून एक नवीन जीवन खळाळूं लागलें म्हणजे या शक्तीचा अव-तार होतो. कथा-लेखकाला अत्यंत आवश्यक असलेला हा गुण आंतरिक आहे. लेखकागणिक या गुणाचें स्वरूप बदलतें. पण तांत्रिक सामर्थ्यापेक्षां ही शक्ति

अनंत पटींनी प्रभावी असते. तिच्यामुळेंच लघुकथेंत अपूर्व हृदयंगमता निर्माण होते.

'मायेचा वारसा' ही गोष्ट अशीच लेखकाच्या व्यक्तित्वानें रंगलेली आहे. जमिनीला प्राणापेक्षांही प्यार मानणारा, तिच्यापुढें जगांतलें सर्व वैभव तुच्छ लेखणारा एक खेडवळ पण उत्कट जीव दृष्टीला पडल्याबरोबर लेखकानें त्याच्या अंतरंगाशीं समरस होऊन त्याचें मन या कथेंत चित्रित केलें आहे. या गोष्टींतला भटजी हा एक तपस्वी आहे. त्याची बागाईत ही त्याची तपस्या आहे. तो खराखुरा कलावंत आहे. त्याची शेतीवाडी ही त्याची कलाकृति आहे. नऊ महिने पोटातल्या गोळ्याचा भार वाहणाऱ्या आणि प्राणांतिक वेदना सोसून त्या चैतन्ययुक्त गोळ्याला जगांत सुखरूप आणून सोडणाऱ्या मातेच्या त्यागानें आणि वात्सल्यानें या गोष्टींतल्या भटजीचें मन घडविलेलें आहे. लेखकानें या कथेंतला शब्द न् शब्द लिहिला आहे तो या एकाच जाणिवेनें! त्यामुळें भटजीच्या साऱ्या भाषणांत काव्याची मोहकता प्रतिबिंबित झाली आहे. एखाद्या मुलानें कृतघ्नपणानें आईची हयगय केलेली पाहून जसा राग यावा तसा जमीन पडीक टाकणाऱ्या लोकांचा नायकाला तिटकारा वाटतो. आपले कष्ट सफळ होऊन मुलगा कर्तबगार झाला कीं आईबापाच्या मनाला जो आनंद वाटतो तो पडीक जमिनींत उभ्या राहिलेल्या केळी, पोफळी आणि नारळी पाहून भटजीला लाभतो. अमूर्ताला मूर्ताचें स्वरूप देण्यांत, जीवनातल्या एका मूलभूत भावनेचें उत्कट चित्रण करण्यांत आणि ती भावना उदात्त वाटावी इतक्या कौशल्यानें रंगविण्यात सरदेसायांनी या गोष्टींत निःसंशय यश मिळविलें आहे. तिच्यांतून होणारें जीवनाचें दर्शन नुसतें मोहकच नाहीं; तें प्रेरकही आहे.

'समुद्राचें पाणी' ही चोरघड्यांची गोष्ट सरदेसायांच्या कथेच्या मानानें फार लहान आहे. पण तिची परिणामकारकताही तिच्या लांबी-रुंदीवर किंवा अशाच प्रकारच्या कुठल्याही बाह्य गोष्टीवर अवलंबून नाहीं. ती आधुनिक लघुकथेच्या तंत्रांत अगदीं पूर्णपणें बसेल अशी गोष्ट आहे यांत शंका नाहीं. पण तो कांहीं तिचा मुख्य गुण नव्हे.

क्लेटन् हॅमिल्टन या एका अमेरिकन टीकाकारानें लघुकथेची व्याख्या पुढें दिल्याप्रमाणें केली आहे—

'The aim of a short story is to produce a single narrative effect with the greatest economy of means, that is consistent with the utmost emphasis.'

या व्याख्येमध्यें लघुकथेनें मनावर एकच एक उत्कट परिणाम किंवा संस्कार करावा असें हॅमिल्टन म्हणतो. हा परिणाम साधतांना स्थळ, काळ, पात्र, प्रसंग, वर्णन, यांचा फाफट पसारा लेखकानें मांडता उपयोगी नाहीं, साधनांची काट-कसर हा कलात्मक लघुकथेचा एक प्रमुख गुण आहे, या गोष्टीवरही तो भर देतो. प्रो. फडक्यांनीं 'प्रतिभासाधनांत' हेंच मत पुढील शब्दांत व्यक्त केलें आहे–'शक्य तितक्या परिणामकारक रीतीनें आणि शक्य तेवढ्या कमी पात्र-प्रसंगांच्या साहाय्यानें सांगितलेली एकच एक गोष्ट म्हणजे लघुकथा!' 'समुद्राचें पाणी' ही गोष्ट या व्याख्येच्या कसोटीला तंतोतंत उतरते. या कथेंत पात्रें अवघीं दोनच आहेत. गोष्ट सांगणारा 'मी' आणि आगगाडींत त्याच्या डब्यात चढलेला, पोटापाठीमागें लागून मुंबईला जायला निघालेला, पैशानें गरीब पण मनानें श्रीमंत असा एक साधाभोळा सात्त्विक जीव! या गोष्टींत जिला प्रसंग म्हणतां येईल अशी कुठलीही नाट्यपूर्ण घटना घडत नाहीं. हा गरीब प्रवासी दोन दिवसांचा उपाशी असतो. कथेंतला मी त्याला आपल्या डब्यांतले फराळाचे पदार्थ देऊं करतो, पैसे देऊं लागतो. पण या दानाचा स्वीकार करणें त्या दरिद्री मनुष्याच्या अगदीं जिवावर येतें. तो निर्धन आहे; पण लाचार नाहीं. तो अशिक्षित आहे; पण सुसंस्कृत आहे. विषम समाज-रचनेमुळें तो आर्थिक दृष्ट्या अगदीं खालच्या पायरीवर उभा आहे; पण त्याचें जीवनविषयक तत्त्वज्ञान उच्च आहे. या तत्त्वज्ञानावर त्याची उत्कट श्रद्धा आहे. माणसानें मेलेलें अन्न खाऊं नये असें त्याला मनःपूर्वक वाटतें. त्याच्या या सरळ, निर्मळ अंतःकरणांतली उदात्तता वाचकाला प्रतीत व्हावी हाच या लघुकथेचा मुख्य हेतु आहे. तो साध्य व्हावा म्हणून चोरघड्यांनीं कृत्रिम प्रसंगाचा मुळींच आश्रय केलेला नाहीं. त्या माणसाच्या सात्त्विक मनाचे सर्व नाजुक धागेदोरे वाचकाला परिचित करून देण्यावर त्यांनीं आपलें सर्व लक्ष केंद्रित केलें आहे. त्यांच्या काव्यात्मक वृत्तीमुळें आणि कहाणीला शोभणाऱ्या शैलीमुळें त्यांचा हा जीवनदर्शनाचा प्रयत्न यशस्वी झाला आहे.

लघुकथेमध्यें बाह्य गोष्टीपेक्षां माणसाच्या मनाला अधिक महत्त्व आहे हा निष्कर्ष या कथेवरून निघतो. प्रसंग किंवा घटना यांची कादंबरीइतकी लघुकथेला मुळींच जरूरी नाहीं. अद्‌भुत कथा, रहस्यकथा, चातुर्यकथा, वगैरे विशिष्ट प्रकारच्या गोष्टी प्रसंगप्रधान असणें अपरिहार्य आहे. पण त्या कथा मुख्यतः रंजक असतात, जीवनदर्शक नसतात. जिला आपण आजकाल अभिजात आणि कलात्मक लघुकथा म्हणतों ती बाह्य जगातल्या घटनांपेक्षा माणसाच्या मनांतल्या विश्वात जी कांहीं उग्र, उदास, भव्य, भीषण, रम्य आणि सौम्य खळबळ चाललेली असते तिच्याकडे अधिक लक्ष देते. त्यामुळें ज्याच्या व्यक्तित्वात कवि-मनाच्या विविध छटा उत्कटत्वानें मिसळल्या आहेत, ज्याना बाह्य सौंदर्यापेक्षा अंतःसौंदर्याचें आकर्षण स्वभावतःच अधिक आहे, माणसाच्या मनाचें चित्र-विचित्र पापुद्रे हळुवारपणानें दूर करण्याइतका ज्याचा हात नाजुक आहे, एखाद्या निष्पाप, निरपराधी बालकानें चारदोन आण्याच्या खेळण्याकरितां हट्ट धरावा आणि दारिद्र्यामुळें त्याचा मनोभंग व्हावा हें दृश्य दृष्टीला पडताच एखादा घोर अन्याय पाहिल्याप्रमाणें ज्याचें मन तडफडूं लागतें, त्यानाच खऱ्याखुऱ्या कला-पूर्ण आणि परिणामकारक लघुकथा अधिक सहजतेनें व सौंदर्यदृष्टीनें लिहितां येतात.

लघुकथेंत विषयाचें किंवा घटनाचें तादृश महत्त्व नाहीं. महत्त्व आहे तें जीव-नाचें, त्याच्या विविधतेचें, त्याच्या वास्तवतेचें, त्या विविधतेकडे आणि वास्तवते-कडे काव्यात्म परंतु प्रामाणिक दृष्टीनें पाहणाऱ्या लेखकाच्या व्यक्तित्वाचें! प्रख्यात इंग्लिश कथालेखक बेटस् लघुकथा हा अतिशय लवचिक असा वाङ्मयप्रकार आहे असें म्हणतो त्याचें मर्म हेंच आहे. बेटस्‌नें लघुकथेवरल्या आपल्या पुस्तकांत म्हटलें आहे, 'एखाद्या घोड्याच्या मरणापासून पहिल्या प्रेमाच्या पहिल्या क्षणाचा अनुभव घेणाऱ्या मुग्ध मुलीच्या मनापर्यंत, कृतिशून्य अशा एखाद्या शब्दचित्रापासून मोठ्या वेगानें धावणाऱ्या प्रसंगपूर्ण अशा कथानकापर्यंत, एखाद्या सुंदर रंगचित्राप्रमाणें भासणाऱ्या गद्यकाव्यापासून ज्यात शैलीच्या विलासाला आणि अलंकरणाला मुळींच जागा नाहीं अशा सरळ सरळ वर्णना-पर्यंत, भावनांच्या सूक्ष्म छटांनीं उजळणाऱ्या गूढ अनुभूतीपासून ज्यांत भावनांचा

स्थूल पण रसरशीत व ठसठशीत आविष्कार झाला आहे अशा बांधेसूद गोष्टीपर्यंत हरतऱ्हेचें लिखाण लघुकथा या सदरांत येऊं शकतें.'

हरिभाऊ आपट्यांपासून चोरघड्यांपर्यंतच्या सात कथालेखकांनी मराठी लघुकथेच्या अशा प्रकारच्या विकासाला किती हातभार लावला आहे याची स्थूल कल्पना या संग्रहावरून वाचकांना येईल अशी मला आशा आहे.

*शाहुपुरी, कोल्हापूर*
*१७-८-४८*

वि. स. खांडेकर
V.R.S

# डिस्पेप्शिया १

## परिचय

*मराठींतले सर्वश्रेष्ठ कादंबरीकार म्हणून हरिभाऊ आपट्यांचा फार मोठा लौकिक आहे. त्यामुळें त्यांच्या गोष्टी किंवा त्यांच्या प्रतिभेच्या अंगीं असलेले विनोदशक्तीसारखे त्यांचे इतर वाङ्मयगुण यांचा फारसा बोलबाला होऊं शकला नाहीं. सूर्यप्रकाशांत दिव्याचा प्रकाश मंद वाटतो, तसें हें झालें आहे. पण हरिभाऊंनीं कादंबऱ्यांच्या जोडीनें स्फुट कथालेखन केलें असून त्यांतल्या कांहीं गोष्टींत त्यांच्या प्रतिभेचे विशिष्ट गुण प्रतिबिंबित झालेले आहेत. त्यांच्या ' भयंकर दिव्य ' या कादंबरींतले प्रो. हॅन्डी हें पात्र विनोदाच्या दृष्टीनें अविस्मरणीय आहे. ' डिस्पेप्शिया ' या गोष्टींतल्या कृष्णरावाचाही परिचय झाल्यानंतर वाचकांना त्याचा सहसा विसर पडणार नाहीं. उलट आपल्या भोंवतालीं पसरलेले असले अनेक कृष्णराव पाहून त्यांना वारंवार या गोष्टीची आठवण होत राहील.*

*जग हा एक वेड्यांचा बाजार आहे असें अनेकदां म्हटलें जातें, पण त्यांत किती निरनिराळ्या तऱ्हांचे वेडे वावरत असतात आणि त्यांच्या वेडांचे किती विविध प्रकार असतात याची सर्वसामान्य माणसाला कल्पना सुद्धां करतां येणार नाहीं. इतर अनेक गोष्टींत शहाणपणानें वागणारीं माणसें एखाद्या विशिष्ट बाबतींतच वेड्यासारखें वर्तन करतात. या गोष्टींतला कृष्णराव असाच आहे. तो सुशिक्षित आहे, प्रेमळ आहे, निर्व्यसनी आहे. पण एका बाबतींत त्याचा मेंदू किंचित् ढिला आहे. आपली प्रकृति थोडीशी बिघडली तरी स्वतःला फार भयंकर रोग झाला आहे असें मानणारीं आणि तशी समजूत करून घेऊन सभोंवतालच्या माणसांना हैराण करून सोडणारीं जीं माणसें जगांत*

असतात त्यांच्यापैकींच कृष्णराव ही एक वल्ली आहे. लोभी मनुष्य रात्रीं अपरात्रीं उठून आपले पैसे मोजीत बसतो. भविष्यावर विश्वास ठेवणारा उठल्यासुटल्या शनिमंगळाची चौकशी करीत सुटतो. आपल्याला मोठा रोग झाला आहे या भावनेनें पछाडलेलीं माणसेंही अशीच अभिष्टासारखीं वागत असतात. या विकृतीचें चित्र हरिभाऊंनीं या गोष्टींत मोठ्या गमतीनें रंगविलें आहे. तसें पाहिलें तर हें कथानक अगदीं साधें आहे. दोन पत्रांच्या अदलाबदलीमुळें झालेला घोटाळा हाच त्यातला मुख्य भाग ! कृष्णराव ज्या डॉक्टराकडे आपली प्रकृति दाखवायला गेलेला असतो त्यांनीं केलेलें दुसऱ्या रोग्याचें निदान पत्राच्या अदलाबदलीमुळें त्याच्याकडे येतें. आपल्याला मोठें भयंकर दुखणें झालें आहे अशी त्यानें आधींच समजूत करून घेतली असल्यामुळें तें पत्र वाचून तो अगदीं वेड्यासारखे चाळे करूं लागतो. त्या दिवशीं रात्रीं कृष्णरावानें आपल्या बायकोला या काल्पनिक आजाराच्या पायीं कसें पळो कीं पळो करून सोडलें याचें हरिभाऊंनीं केलेलें वर्णन मोठें मजेदार आहे. ते म्हणतात:

'सत्तावीसदां त्यानें आपल्याला ताप आहे कीं काय म्हणून ज्वरमापक लावून पाहिला असेल. आपल्याला श्वास लागला आहे असें तर कितीक वेळां त्यास वाटलें. त्या बिचाऱ्या बायकोस असें झालें कीं ही रात्र उलटून एखाद्या चांगल्या डॉक्टरकडून परीक्षा होते कशी ? 'माझं अंग पहा बरं, ताप कितपत आहे तो ?' असें म्हणून त्यानें कितीदां तरी तिला अंगाला हात लावून पाहण्यास सांगितलें आणि तिनें 'कांहीं नाहीं; अगदीं गार आहे' असें म्हटलें म्हणजे एखाद्या वेळीं तिच्या अंगावर येऊन 'तुझं असंच आहे. चांगला माझ्या हाताला ताप लागतोय् आणि तुझ्या हाताला मात्र तो लागत नाहीं' असें म्हणून थर्मामीटर लावावें; दहा बारा मिनिटें लावावें. ज्वर नाहीं असें त्यानें दाखविलें म्हणजे तेंच वाईट आहे, जुनें झालें आहे, असें तरी म्हणावें किंवा 'मला वाटतें माझें अंग गार पडत चाललें आहे.' असाच नाद घेऊन बाईल्यांनीं शेकण्यापर्यंत पाळी आणावी !'

आपल्याला अग्निमांद्य झालें आहे, कांहीं म्हटल्या कांहीं पचत नाहीं, अशी या गृहस्थाची समजूत झालेली असते ! पण सारी रात्र मृत्यु जणुं

काय आपल्या उशापायथ्याशीं लपून बसला आहे. अशा कल्पनेनें अस्वस्थ मनःस्थितींत घालविल्यावर दुसरे दिवशीं सकाळीं त्याला भूक लागायाची ती लागतेच! आपण आतां लौकरच मरणार या एकाच विचारानें बिचाऱ्याला पछाडलें असल्यामुळें आपल्याला भुकेमुळें कसेंसेंच होत आहे हें त्याच्या लक्षांतच येत नाहीं. ज्याला अग्निमांद्य झालें आहे त्याला भूक कसली कपाळाची लागणार असेंच त्याला वाटत असतें. त्याच्या बायकोला त्याची खरी स्थिति कळते. 'कांहीं सांजाबिंजा करून आणूं का?' म्हणून ती त्याला विचारते. त्याबरोबर ही स्वारी तिच्यावर उसळून म्हणते, 'कसचा बोडक्याचा सांजा करतेस! आतां सांजा कसचा आला आहे' बरं आण, शेवटचा एकदां तुझ्या हातचा खाऊन घेऊं दे!'

कोल्हटकर किंवा गडकरी यांच्या अतिशय सुंदर कोटींइतकेंच कृष्णरावाचें हें शेवटचें वाक्यही हास्य निर्माण करतें. अगदीं साध्यासुध्या घरगुती प्रसंगांतून आणि सर्वसामान्य माणसाच्या वास्तव चित्रणांतून हरिभाऊंनीं आपल्या उत्कृष्ट सामाजिक कादंबऱ्या निर्माण केल्या. त्यांच्या या विनोदी गोष्टींतही तेच गुण आढळतात. ही गोष्ट हा स्वभावनिष्ठ विनोदाचा एक चांगला नमुना आहे.

'दामोदर, रे दामोदर, पत्रें बित्रें कांहीं आलीं आहेत कीं नाहींत?' 'नाहीं!' असें उत्तर मिळतांच सकाळीं फेरफटका करून आलेले कृष्णराव वकील आपल्या ऑफिसमधील एका ईझिचेअरवर बसले. अलीकडे कृष्णराव अगदीं उदास दिसत असत. त्यास असें वाटत असे कीं, आपण अगदीं खंगलों आहों व अशक्त झालों आहों. असो. कृष्णराव ज्या वेळीं घरीं परत आले, त्या वेळीं राधाबाई घरांत कामें करीत होत्या आणि इकडे कृष्णरावांची चर्या तर अशी दिसत होती कीं, त्यांच्या मनांत कांहीं तरी चमत्कारिक व महत्त्वाच्या अशा विचारांनीं काहूर उठविलें असावें. आल्याबरोबर बराच वेळपर्यंत ते तसेच पडून राहिले होते. थोडा वेळ गेल्यानंतर ते म्हणाले, "हें पहा, आहे का माझा आतां कांहीं उपयोग? काय केलें मीं? एवढा शिकलों, हाडांचीं काडें केलीं, अभ्यास करून परीक्षांवर परीक्षा पास झालों. पण त्या-

पासून फायदा तो काय झाला? छे, छे! मी फारच वाईट केलं! नसता एवढा मरे मरे तों अभ्यास केला तर काय झालें असतें? असा हा फाजील अभ्यास तरी माझ्या हातून काय करणार? शरीराची हानि मात्र करून घेतली; नसता रोग मात्र लावून घेतला; दुसरें काहीं नाहीं. आणि ह्या माझ्या मूर्खपणाची, हावरेपणाची व अविचाराची फळें आतां माझ्या लाडकीला भोगावीं लागणार ना? त्यापेक्षां माझें लग्नच नसतें झालें तर काय वाईट झालें असतें? पण त्या लग्नाच्या नावानें तरी का दगड फोडायचे? एकविसाव्याच वर्षी ना माझें लग्न झालें? मग त्याबद्दल माझ्या आईबापांना तरी काय म्हणून दोष द्यावा? त्यांनीं का मला शक्तीच्या बाहेर अभ्यास कर म्हणून सांगितलें होतें? त्यांनीं का रात्रंदिवस पुस्तकें उरावर घेऊन पड म्हणून सांगितलें होतें? आग का लावायची आहे आतां या भाराभर परीक्षांना? काय हें पंचविसावें वर्ष संपतें न संपतें तों आम्हांला क्षयाची भावना? अहो, हा डिस्पेप्सिया म्हणजे क्षयाचा पायाच नाहीं तर काय? एक घांसभर अधिक जेवण झालें कीं लागली अस्वस्थता व्हायला! अंमळ एखादें दुसरें भजें किंवा थालिपिठाचा तुकडा खाल्ला, कीं उशाशीं मेणबत्तीचा दिवा पाहिजेच रात्रीं जागावयाला! काय ही आमची प्रकृति, आणखी काय हें आमचें जिणें! एवढ्यांपासूनच लागलें आमचें शरीर अगदीं फिक्कट नि निस्तेज दिसायला! आतां आमच्या हातून आमच्या देशाचें हित तें काय होणार? आम्ही आमच्या समाजाची सुधारणा ती काय करणार? काय करायची आमची विद्वत्ता, आमचें शहाणपण आणि आमचें ज्ञान! हाच जर आमचा क्रम कायम राहिला, दिवसें-दिवस आमच्यांत सुधारणा न होतां असेच अगदीं ज्वान जर आम्ही राहिलों, तर काय, आमचा अवतार बहुतेक तिशीच्या आतच संपायचा! मग आमच्या नांवानं आईबापांनीं, बायकापोरांनीं आणि सर्व..." इतक्यांत दामोदर सातआठ पत्रें घेऊन धांवत धांवत आला. अर्थात् कृष्णरावांना आपले आत्मगत, परंतु जवळ आसपास असलेल्या मनुष्यास सहजीं ऐकूं जाण्यासारखे, विचार तेथेंच थांबवावे लागले. दामोदरानें दिलेल्या पत्रांतून कृष्णरावांनीं आपल्या ओळखीचें असें पत्र हातांत घेतलें. तें घेतल्याबरोबर त्यांना कसेंसेंच वाटलें; परंतु त्यांनीं तें एकदम फोडलें. सदरील पत्र इंग्रजींत होतें. त्याचा सारांश असा होता:—" कळविण्यास फारच वाईट वाटतें कीं, ज्या रोगानें

आपणांस ग्रासलें आहे असा तुम्हांला आजपर्यंत निव्वळ संशय होता तो रोग खरोखरच तुम्हांला त्रास देत आहे. एवढे दिवसपर्यंत तुम्ही उगीच हयगय केलीत. आता आपला रोग बराच अनावर झाला आहे. कोणीही डॉक्टरानें इतक्या स्पष्टपणें रोग्यास स्वतः कधीं असें लिहूं नये; परंतु 'जें काय खरें असेल तें सांगा. यत्किंचित्‌सुद्धां भीड धरूं नका. मला त्याप्रमाणें विचार करून पुढची तरतूद करणें भाग आहे.' असें आपण निक्षून सांगितलें म्हणूनच मी हें अगदीं स्पष्टपणें आपणास लिहित आहें. तथापि अगदीं निराशच व्हावयास नको. यानंतरहि आपणास नीट करण्यास मी आपणाकडून होईल तितकें करीनच. कधींहि माघार घेणार नाहीं."

"काय !" कृष्णराव आपल्याशींच म्हणाले, "खरोखरीच का माझा अवतार संपला ? गणपतरावाचीसुद्धां खात्री झाली ? आतां आणखी काय पाहिजे ? यावरून हें ठरलेंच कीं, मला अकालीं हा मृत्यु यावयाचाच ! पण माझी बायको ! माझा बाळ्या ! हाय ! हाय ! काय सर्वांना मी चांडाळ अगदीं पोरकें करून जाणार ?"

कृष्णराव वरील वाक्य इतकें मोठ्यानें बोलले कीं, तें घरांत राधाबाईंसहि ऐकूं गेलें ! त्या घाईघाईनें कृष्णरावाकडे आल्या; परंतु त्यांच्या पावलाचा आवाज ऐकल्याबरोबर कृष्णरावानीं तें पत्र चटकन् चुरगळून खिशांत घातलें. 'तें काय आहे ? कसलें पत्र आहे ?' असला प्रश्न यायला नको. राधाबाईंनीं आधीं ते आत्मगत भाषणांतले शब्द ऐकलेच होते, तेव्हां त्यांनीं एकदम "काय ! आता काय बोलणं चाललं होतं ? कोणाला पोरकं करून जाणार ? हें आहे तरी काय आतांशा आपल्या डोक्यानं घेतलेलं ? ज्या त्या गोष्टीचा नाद ! अभ्यासाच्या दिवसांत अभ्यासाचा नाद. शरीराकडे पाहिलं नाहीं, हाडांचीं काडं केलीं, अभ्यास केला, परीक्षा झाल्या. आतां दोन पैसे मिळूं लागले, तर आतां हा 'कांहीं तरी होतं आहे, कांहीं तरी होतं आहे' असाच नाद लागला आहे. आतां याला म्हणावं तरी काय नि करावं काय ? बरं, गणपतराव भावजींकडे जाऊन, नाहीं तर त्यांना इथें एकदां बोलावून आणून त्यांच्याकडून तपासून घेऊन कांहीं औषध तरी घ्यावं म्हणून आज किती दिवस म्हणतें आहें; पण तें कांहीं होईना. आधीं खरं म्हटलं तर होत नाहीं कांहींच, नुसती मनाची कल्पना बाधते आहे, दुसरं कांहीं नाहीं. बरं त्यांतून कांहीं होतंयसं वाटतं, तर

त्याला उपाय नको का करायला ? का आपलं असंच बसायचं ? गणपतराव भावजी जिवापाड मेहनत करून नाहीं का औषध देणार ? जावं एकदां त्यांच्याकडे. नाहीं तर असं कशाला ? मी स्वतःच आतां जातें आणखी जाऊन त्यांना घेऊन येतें बोलावून !" असें म्हणून राधाबाईंनीं पदर घेतला.

त्याबरोबर कृष्णराव उसासा टाकून म्हणतात:—"झालं, गणपतराव भावजींचं झालं आणखी सगळ्यांचं झालं. अग, नसती कल्पनाच उगीच कशी होईल ? तुझ्या या 'कल्पना आहेत. कल्पना आहेत. कसला आला आहे डिस्पेप्शिया, कसलें आलें आहे अजीर्ण !' अशा म्हणण्यानंच तर आजपर्यंत हयगय होऊन या थरावर गोष्टी आल्या. असो झालं. आतां काय त्याचं ? गणपतराव मोठा स्नेही झाला आणखी त्यानं अतिशय काळजी घेतली म्हणून काय आमच्या नशिबीं आहे तें का चुकतें आहे कोणाला ? आतां थोडे दिवसांचा तुमचा आमचा संबंध राहिला इतकंच." असें म्हणून पुनः त्यानें दोन उसासे टाकले. कृष्णरावांची आपल्याला कांहीं झालें असून ते अगदीं अनावर झालें आहे व आपण त्याच्या तडाख्यांतून सुटत नाहीं, अशी कुरकुर आज बरेच दिवस चालली होती. आज काय पोटांतूनच खुटखुटतें, उद्या काय आमांशच झाला, परवां छातींत जळजळतें, तेरवां पोट फुगलें, असें रोज कांहींना कांहीं तरी आपणांस होतें असें त्यांस वाटे आणि तें नुसतें वाटतेंच आहे, त्यांत तथ्यांश कांहीं नाहीं असें राधाबाईस वाटून त्या त्याप्रमाणें बोलत. वस्तुतः प्रकार काय होता हें ज्याचें त्यास ठाऊक. त्याचा बाह्य परिणाम कोणाच्याच नजरेस अजून पडूं लागला नव्हता. मात्र गणपतराव डॉक्टराजवळ तो आपला फार स्नेही म्हणून मोठ्या विश्वासानें जेव्हां जेव्हां कृष्णराव आपल्या आजाराची गोष्ट काढी, तेव्हां तेव्हां गणपतराव त्याची निव्वळ थट्टा उडवून त्यास तुला मोनोमॅनिया ( एकाच गोष्टीचें वेड ) झाला आहे असें म्हणे. शेवटीं एकवार गणपतरावास एकटाच गांठून गंभीरपणानें एकदां विचारावें आणि त्याहि वेळीं नीट पाहून उत्तर दिलें नाहीं तर त्याचा नाद सोडून दुसऱ्या कोणत्या तरी डॉक्टराकडे जाऊन आपल्या रोगाची परीक्षा करून घ्यावी असा त्यानें निश्चय केला व आदलेच दिवशीं संध्याकाळीं त्यानें गणपतरावाकडे जाऊन अतिशय गंभीरपणानें त्यास आपली हकीकत सांगितली. त्या वेळीं काय झालें तें आतांच सांगण्यांत स्वारस्य नाहीं. सबब तें आतांच न सांगतां पुढील हकीकतीकडे वळूं.

इतक्या निराशेचे उद्‌गार ऐकल्यावर त्या बायकोला काय वाटलें असेल याची कल्पनाच करावी. आपण खरोखरीच नवऱ्याच्या त्या स्थितीला कारण झालों काय ? असें मनांत येऊन तिला धसका बसला व ती एकदम रडूं लागली. पण ती धीराची होती, आणि नवऱ्याला खरोखर कांहीं दुखणें नाहीं, यदाकदाचित् किंचित् असलें तर तें इतकें मनाला लावून घेण्याजोगें नाहीं, असें तिच्या मनाला अद्यापि वाटत होतें. तेव्हां ती पुनः म्हणते, "गणपतराव भावजींचं झालंन् सगळ्याचं झालं म्हणजे काय ? त्यांच्याकडे जाऊन त्यांना नीट सगळं सांगून तपासून घेतल का ? का आपलं आपल्याशींच कांहींतरी मनाला लावून घेऊन बसायचं ? "

कृष्णराव त्रासून म्हणतो, "काय त्रास आहे बुवा ! मी आतां तुला सांगितलं ना कीं गणपतरावाला विचारलंन् सगळं झालं म्हणून—मोठे आमचे स्नेही ते. पहिल्या प्रथम माझ्या मनात शंका आल्या दिवसापासून त्याला सांगतों आहें कीं धंद्यावारी घालवूं नको बरं ! पण छे ! त्यानं इथं यावें, तुझ्या देखत थट्टा करावी ! तूं हंसावंस, मी आणखी कांहीं बोललों कीं टर करावी. क्लबांत मंडळींत गेलों कीं, मला 'ओ ! लो ! मि. डिस्पेप्शिया ! कसं काय आहे तुमचं पोट ? कसा काय आहे तुमचा म्यानिआ ? ' असें म्हणून मंडळीस हंसवावें म्हणजे झालं. अन् मला एखाद्या तिऱ्हाइतासारखें लिहितो कीं 'तुमचं दुखणं आतां अनावर झालं आहे. पहिल्यापासून तुम्हीं त्याची काळजी घेतली नाहींत.' पुन्हां गुलामाचें तोंडसुद्धां पाहूं नये असें मला वाटतें कसले हे स्नेही न् कसलं काय ! मला वाटतं फी मिळणार नाहीं या भयानं आणि औषधाचे पैसे येणार नाहींत या भयानंच यानं आजपर्यंत सगळा प्रकार थट्टेवारी घालवला. तें कांहीं नाहीं. आतां त्याचा नाद सोडून देऊन आपलं दुसऱ्या एखाद्या डॉक्टराच्या कच्छपीं लागलं पाहिजे. स्नेही बरं हे ! हे स्नेही ! वाचा वाचा हें पत्र !" असें म्हणून त्यानें तें चुरगळून खिशांत घातलेलें पत्र तिच्या अंगावर टाकलें. राधाबाईला बिचारीला काय वाचायला येणार ? पण तिनें तें उचलून घेतलें आणि कोणापासून तरी वाचून घेऊं असें मनांत आणून आपल्याजवळ ठेवलें. कृष्णरावाचा चेहरा अगदीं उदास झाला. आजपर्यंत जें भय त्यास वाटत होतें तें कायम झाल्यामुळें त्यास फारच वाईट वाटलें. आजपर्यंत लोकांनीं 'तुम्हांला कांहीं झालं नाहीं हो. अगदीं तुमची निव्वळ कल्पना आहे—' असें म्हटलें म्हणजे

एखादे वेळीं तरी असें वाटे कीं, खरोखरीच नुसती कल्पना असेल आणि कल्पनेनेंच आपण आपलें शरीर झिजवून घेत असूं. पण आज त्या गोष्टीचा अगदीं निकाल लागल्याप्रमाणें झालें. कल्पना कल्पना करून लोकांनीं आपणांस फसविलें, आणि आपण काळजी घेऊं घेऊं म्हणतां म्हणता ती आपल्यास घेतां आली नाहीं, याबद्दल त्याला अतोनात वाईट वाटलें.

नवऱ्याचें दुखणें खरोखरीच अनावर झालें आहे असें जर खचित असेल तर त्याचा दोष आपल्या माथीं येतो. आपण खरोखरीच निष्कारण थट्टा करून त्यास औषधें करूं दिलीं नाहींत याबद्दल तिलाहि फार वाईट वाटलें. तिनें आपल्या अश्रुपूर्ण नेत्रांनीं तीनतीनदां आपल्या नवऱ्याकडे पाहिलें. हेतु हा कीं, दुखणें अनावर होऊन अगदीं निराश होण्याजोगें कांहीं तरी चिन्ह दिसतें आहे कीं काय हें पहावें. पण तसें तर कांहीं दिसेना. तेव्हां ती मोठ्या घुचकळ्यांत पडली. नवरा म्हणतो त्याप्रमाणें खरोखरीच गणपतरावानें आपल्या पत्रांत लिहिलें असल्यास गणपतराव कांहीं उगीच लिहिणार नाहीं. पण खरें असलें तरी गणपतरावानें असें लिहावें कीं काय ? त्याला इतकाला स्वभाव टाकून कीं दुखणें एकपट असलें तर शंभरपट वाढून निकामी मनाला हाय घेऊन बसायचें. आणखी त्यानें असें लिहिलें कसें ? पत्र आपण कोणाकडून नीट वाचून घेऊन मुकाट्यानें गणपतरावाकडे जाऊन मग निकाल करून घेऊं असा तिनें आपल्या मनांत विचार केला आणि नवऱ्याच्या मनास कांहीं समाधान व्हावें या हेतूनें ती त्यास म्हणते, "कांहीं तरी थट्टेनं लिहिलं असेल गणपतरावांनीं बरं. नीट वाचलं नसेल. मी म्हणतें जर खरोखरीच तसं कांहीं काळजी करण्यासारखं असतं तर त्यांनीं आपण म्हणतां असं कधीं लिहिलं नसतं. आपण नेहमीं नेहमीं तेंच तेंच घेऊन बसायचं, म्हणून त्यांनीं कांहीं तरी लिहिलं असेल झालं. दुसरें काय ?"

"पुरे. पुरे. मला कीं नाहीं या असल्या बोलण्याचा फार संताप येतो. आतां उगीच माझे थोडे दिवस राहिले आहेत त्यात संतापवूं नको. आपलं सुखासमाधानानं उरलेले दिवस काढूं दे. मला प्रत्यक्ष भोगावं लागत आहे. त्यानं स्पष्टपणानं लिहिलं आहे कीं, स्थिति वाईट आहे. मग काय आतां ? मला चमत्कार वाटतो तो, त्यानं मी आजपर्यंत हयगय केल्याचा दोष माझ्या माथीं मारला आहे, याबद्दल होय. चकचकीत त्यानं लिहिलं आहेन् कीं,

आजपर्यंत तुम्ही हयगय केली त्यामुळें हा रोग इतका अनावर झाला आहे. तेव्हां आता त्याला काय म्हणावं ? "

इतकं म्हणून त्यानें पुनः उसासा टाकला. कांहीं तरी दुसरा विषय काढून यांचें चित्त दुसरीकडे नेलें पाहिजे, असें मनात येऊन तिनें म्हटलें, " बरं. पण वन्संनी बोलावलं आहे तिकडे चार दिवस हवा बदलायला तरी जाऊं म्हणजे बरं वाटेल. हवा बदलल्यानें काहीं कमी नाहीं बरं वाटत. तिकडची हवा आणखी कायशी चांगलीहि आहे."

" चांगलीन् वाईट; आता सगळीकडे सारखीच हवा आहे आम्हांला, आतां एकदाच हवा बदलेल म्हणजे झालं !"

" हें काय असलं बोलावं ? मी अगदीं खचित सांगतें कीं, काहीं तरी चूक झाली आहे. नाहींतर गैरसमज झाला आहे. गणपतराव भावजी कांहीं असं ल्याहायचे नाहींत. नाहींतर त्यांनीं थट्टा केली असेल."

" तर ! तर ! थट्टा केली असेल !" कृष्णराव वस्कन् अंगावर येऊन म्हणतो, " आमच्या सगळ्या जन्माची थट्टा झाली आहे. आम्ही मरून लाकूड होऊन पडलों तरीसुद्धा तुम्हांला वाटणार हा थट्टेनंच मेला आहे. तेव्हां देखील सारी मंडळी मिळून माझ्या मढ्याची थट्टा करून हंसा म्हणजे झालं !"

कृष्णराव हे सर्व शब्द इतक्या संतापानें बोलला, कीं आपण कोणिकडून तोंडातून शब्द काढले असे वाटून राधाबाई अतोनात पस्तावली. आणि तिला अनावर झालेला हुंदका आता बाहेर पडेल, या भयानें एकदम तेथून निघून चालती झाली. थोडा वेळ तसाच गेल्यावर तिनें हलकेच कृष्णरावांच्या कारकुनाला एकीकडे बोलावून तें पत्र त्याच्यापुढें टाकून म्हटलें, " दामुअण्णा, हें पत्र एवढं नीट वाचून मला त्यांत काय आहे तें नीट सांगा हो." दामुअण्णानीं पत्र पाहून त्यातील साद्यंत मजकूर सांगितला तो नवऱ्यानें सांगितल्याप्रमाणेंच होता. तथापि तो तिला बरोबर वाटेना. तिला असें वाटे कीं, कांहीं तरी यांत थट्टा तरी असावी, किंवा कांहीं चूक झाली असावी. खरें असलें तरी गणपतराव इतक्या निक्षून कधींसुद्धां लिहिणार नाहीं, आणि लिहिण्याचें प्रयोजन काय ? दिवसांतून एखादी दुसरी तरी खेप व्हायची, निदान दोन दिवसांनी तरी खास, असें असून त्यानें आधीं पत्र लिहिण्याचें कारण काय ? हेंच तिला समजेना. नवऱ्याजवळ ह्या आपल्या शंका उच्चारून दाखविण्याची

सोयच नाहीं तो आतां अगदीं इतका हातपाय गाळून बसला, कीं कांहीं बोलायची सोय नाहीं. सगळ्या रात्रींत एक क्षणभरसुद्धां त्याला झोंप नाहीं. अंथरुणावर पडे, पुन्हां उठे, येरझारा घाली. त्या दिवशीं तिनें आपल्याकडून त्यास पुष्कळ प्रकारानें समाधानाच्या गोष्टी सांगून पाहिलें; परंतु कृष्णरावाचें समाधान होईना. आधींच तो हळवा आणि त्यांत गणपतरावासारख्या स्नेही डॉक्टरानें असें स्पष्ट सांगितलें कीं, तुमचा रोग अनावर झाला आहे. मग काय विचारतां ? पंचवीसदां तो बहिर्दिशेस गेला असेल, सत्तावीसदां त्यानें आपल्याला ताप आहे कीं काय म्हणून ज्वरमापक लावून पाहिलें असेल. आपल्याला श्वास लागला आहे असें तर कितीक वेळां त्यास वाटलें. त्या बिचाऱ्या बायकोस असें झालें कीं, ही रात्र उलटून एखाद्या चांगल्या डॉक्टराकडून परीक्षा होते कशी ? "माझें अंग पहा बरें, ताप कितपत आहे तो ?" असें म्हणून त्यानें कितीदां तिला अंगाला हात लावून पाहण्यास सांगितलें आणि तिनें "कांहीं नाहीं; अगदीं गार आहे." म्हटलें म्हणजे एखादा वेळ तिच्या अंगावर येऊन "तुझें असेंच. चांगला माझ्या हाताला लागता आहेन् तुझ्या हाताला लागत नाहीं ?" असें म्हणून थर्मॉमिटर (ज्वरमापक) लावावें. दहा बारा मिनिटें लावावें. ज्वर नाहीं असें त्यानें दाखविलें, म्हणजे 'तेंच वाईट आहे, जुनें झालें आहे.' असें तरी म्हणावें किंवा 'मला वाटतें माझें अंग गार पडत चाललें आहे,' असाच नाद घेऊन बाटल्यांनीं शेकण्यापर्यंत पाळी आणावी ! राधाबाईस बिचारीस ती रात्र सरतां सरेना. शेवटीं एकदांची सरली आणि सकाळ झाली. त्याबरोबर तिनें 'मी आतां स्वतः गणपतरावजींकडून जाऊन येतें' म्हणून उठली. पण हा गृहस्थ तिला जाऊं देईना. 'माझ्या जवळून हलूं नको.' म्हणे 'कोण्या वेळीं काय होईल कोण जाणे?' शिवाय गणपतरावाला न आणतां दुसऱ्या कोणा तरी डॉक्टरला आणावा असा त्याचा विचार होता. आणि त्याप्रमाणें त्यांनीं दामोदरला डॉक्टरास बोलावून आणण्यास सांगितलेंहि. गणपतरावानें इतक्या विलक्षण तऱ्हेनें लिहिलें आहे, त्या अर्थी तेहि एकदां येतीलच. काल रात्रींच कसे आले नाहींत याबद्दलच तिला मोठें आश्चर्य वाटलें. इकडे कृष्णरावांची स्वारी तर अंतकाळ समीप आला म्हणजे मनुष्य निरवानिरव करूं लागतो, त्याप्रमाणें करूं लागली आणि राधाबाईस तसें कारण तर कांहींच दिसेना. गृहस्थाला सडकून भूक लागली, तेव्हां कसेंसेंच होऊं

लागलें. पण ती भूक हें त्याच्या लक्षांत येईना. 'भूक लागली असेल, कांहीं सांजाबिंजा करून आणूं का?' विचारलें असतां "कसचा बोडक्याचा सांजा करतेस? आतां सांजा कसचा आला आहे? बरें आण, शेवटचा एकदां तुझ्या हातचं खाऊन घेऊं दे." असें म्हणाला इतक्या त्या एकंदर स्थितींतसुद्धां खरोखर त्या बिचारीला हंसूं येण्याजोगें बोले. वरून तर त्यांच्या त्या स्थितींत कांहींसुद्धां तिला कमी जास्ती दिसलें नाहीं.

अशी एकंदर व्यवस्था चालली असतां डॉक्टर आले. त्यांनीं खिडक्या खिडक्या उघडून नाडीबिडी पाहिली, जीभ पाहिली; पण त्यास आजाराचें चिन्ह तर कांहींच दिसेना. थरमॉमिटर लावून पाहिलें, ताप नाहीं; तेव्हां शेवटीं काय होतें म्हणून विचारता, यांनीं आपल्याकडून आपल्या डिस्पेप्शियाचें वर्णन दिलें आणि क्षयाचीहि भावना झाल्याचें सुचविलें. डॉक्टरांनीं पोट, छाती, पाठ तपासून पाहिली; लिव्हर, फुप्फुस किंवा दुसऱ्या कांहींहि ठिकाणीं दर्द सांपडेना; डोळे पाहिले, पुनः नाडी पाहिली, जीभ पाहिली आणि बराच वेळ त्यांनीं आपलें डोकें खाजवून शेवटीं म्हटलें, "तुम्हाला कांहीं विशेष झाल्याचें आपल्याला तर आढळत नाहीं; तुम्हांला कांहीं झालेंच नाहीं. डिस्पेप्शिया म्हणतां; पण त्याचें एकहि लक्षण दिसत नाहीं. जीभ थोडी खराब दिसते; पण अशी जागरणानं किंचित् अजीर्ण होऊनहि दिसते. कांहीं नाहीं, तुम्ही जरा दोनदां तीनदां पौष्टिक पदार्थ खाऊन सकाळीं संध्याकाळीं चारदोन मैलांची रपेट करून येत जा. भूक लागत नाहीं म्हणतां तर चारपांच दिवस घेण्यापुरतें औषध देतों तें घ्या. म्हणजे प्रकृति साफ होईल." असें म्हणून त्यांनीं भराभर कांहीं खरडून तो कागद देऊन ते आपली फी घेऊन चालते झाले.

त्यांची गाडी वाजली असेल नसेल तोंच कृष्णराव राधाबाईला म्हणतात, "या डॉक्टरांना कांहींसुद्धां समजत नाहीं. हे आमच्या गांवांतले मोठे धन्वंतरी. आणखी यांनीं इतक्या निष्काळजीपणानं तपासून कांहीं नाहीं म्हणून सांगायचें. कांहीं अर्थ नाहीं याच्यांत झालें." पण राधाबाईला त्या डॉक्टरांच्या बोलण्यानें किती तरी धीर आला. ती लागलीच त्यांस म्हणते, "उगीच आतां नादिष्टपणानं दुखणं दुखणं म्हणून काय करीत बसायचं?" हा बोलाचालो होते आहे तों इतक्यांत गणपतराव डॉक्टरांकडून कोणी माणूस चिठ्ठी घेऊन आला. ती चिठ्ठी आंत कृष्णरावांच्या हातांत येतांच "अशा प्रसंगीं आपण

स्वतः येण्याचं टाकून चिठ्ठया पाठवतो आहे, आतां याला काय म्हणावं ? कसला खोडी दगडाचा ? सगळा पैसा ! लेका, फी घे, नको कोणी म्हणतं आहे का काय ?” असें म्हणत त्यानें तीं फोडली. तों आंतून एकांत एक दोन चिठ्ठया निघाल्या. पहिली अशी होतीः —

“ प्रिय मित्रा,

माझ्या हातून काल एक मोठी गाढवासारखी चूक झाली. तुला पाठविण्यासाठीं चिठ्ठी लिहिलेली दुसऱ्याच एका रोग्याच्या पाकिटांत जाऊन त्याच्यासाठीं लिहिलेली तुझ्याकडे आली. आज रोजीं सकाळीं मी त्यास पाहण्यासाठीं म्हणून गेलों तेव्हां त्यांनीं ती मला दाखविली. तेव्हां माझी चूक माझ्या नजरेस आली. ती चिठ्ठी सोबत पाठविली आहे. मी ही चिठ्ठी त्याच रोग्याच्या घरीं लिहित आहें. येथलें काम आटपण्यास बराच अवकाश लागेल, नाहींतर मी आतांच तुझ्याकडे येऊन क्षमा मागितली असती. दुपारीं तूं घरीं नसशीलच. तेव्हां संध्याकाळीं तुझ्या शिव्या खाण्याकरीतां, आणि डिस्पेप्शियाची काल्पनिक रडगाणीं ऐकण्यासाठीं येतों. जेवायला राहाण्याच्याच बेतानें येईन.

धांदलींत असलेला मित्र—

*गणपती*”

दुसरी चिठ्ठी होती ती अशी :—

“प्रिय मित्रा कृष्णा,

तूं मलतेंच कांहीं डोक्यांत घेऊन बसला आहेस, याला आतां म्हणावं तरी काय ? काळीज, फुप्फुस, लिव्हर, किडनी यांपैकीं एकादेखील भागाला कांहीं झालेलें नाहीं. रिकामें वेड काय आपल्याला लावून घेऊन नसतें दुखणें उत्पन्न करतो आहेस ? चांगला दोन चार वेळ सांजामिंजा खाऊन ( मला पंक्तीला घेतल्याशिवाय नव्हे हो पण ! ) रोज दोन चार मैल रपेट करून येत जा; म्हणजे असल्या कल्पनासुद्धां तुझ्या मनांत येणार नाहींत. शंकेखोरपणानेंच तूं मूर्खपणा करून आपल्याला व घरांतल्या मंडळीस नसता त्रास उत्पन्न करशील. माझी सगळी डिस्पेन्सरी पिऊं इच्छिणाऱ्या वेड्या पिरा—डिस्पेप्शियाराव, हा नादिष्टपणा आपण लवकर सोडा नाहीं तर आपणाला कुलाब्याकडचें एक विशेष लोकांकरितां बांधलेलें घर दाखवावें लागेल.”

हीं दोनही पत्रें वाचल्यावर स्वारीच्या मनाची जरा चलबिचल झाली. तें आदले दिवसाचें पत्र आणून पुन्हां एकदां वाचून पाहिलं, तों खरोखरीच तें अत्यंत प्रिय मित्रानें अत्यंत प्रिय मित्राला लिहिल्याप्रमाणें नसून तिऱ्हाईत श्रीमंताला लिहिल्याप्रमाणें होतें. पण हें पहिले दिवशीं स्वारीचे लक्षात आलें कोठें?

त्या थोरल्या डॉक्टराच्या सांगण्यानें अर्धवट साफ झालेलें मन आतां अगदीं साफ झालें. पण तसें बायकोला बोलून दाखविण्यास त्याचें मन धजेना. कारण ती आपली टर उडवील. तेव्हां तीं दोनही पत्रें "पहा हे काय आचरट भावजी लिहितात तें. अगदीं मूर्ख बेटा!" असें म्हणत तिच्या अंगावर टाकलीं आणि दामोदरास तीं वाचून सांग असे सांगितलें. तो अर्थ कळल्यावर "मी आधींच म्हटलं होतं हें असं काहीं तरी झालं असेल!" असें राधाबाई म्हणाली आणि "तूं असं म्हणणारच हे आम्हाला ठाऊकच." असं कृष्णराव म्हणाला. शेवटीं संध्याकाळीं गणपतराव येऊन त्यानें सर्व हकीकत ऐकून केलेली थट्टा व कृष्णराव थट्टेनें चिडून, संतापून त्यानें दिलेल्या शिव्या व शेवटीं "आम्ही मरायला टेकलों तरी तुम्ही आमची चेष्टाच करणार हें आम्हांला ठाऊक." असें उच्चारलेलें वाक्य हीं मोठीं मजेदार होतीं. आपल्यास काहीं झालें नाहीं. डिस नाहीं आणि पेप्शिया नाहीं, असें खरोखरी वाटेपर्यंत दोन महिने लागले आणि तें वाटूं लागलें तरी त्यानें स्पष्टपणे कधींच कोणाजवळ—त्यांतून राधाबाईजवळ तर नांवसुद्धा नको—कबूल केलें नाहीं. अजूनसुद्धां तो असेंच म्हणतो कीं गणपतरावाची व इतर सर्व डॉक्टरांची चूक आहे. मला डिस्पेप्शिया आहेच. 'स्वभावो दुरतिक्रमः!'

• • •

## अभ्यास

१. न. चिं. केळकरांची ' माझी आगगाडी कशी चुकली ? ' ही गोष्ट वाचून हास्यरसाच्या परिपोषाच्या दृष्टीनें तिची या कथेशीं तुलना करा.

२. भविष्याच्या नादानें आपली फटफजिती करून घेणाऱ्या एखाद्या ' कृष्णरावा'वर एक छोटी गोष्ट रचण्याचा प्रयत्न करा.

३. या गोष्टींतली राधाबाई घडलेली सर्व हकीगत आपल्या आईला लिहून कळवीत आहे अशी कल्पना करून एक पत्र लिहा.

# अंगणांतला पोपट २

## परिचय

*एका बाळजीवाचें दुःख मोठ्या नाजुक कलमानें चित्रित करणारी ही लघुकथा अनेक दृष्टींनी अभ्यसनीय आहे. लघुकथा ही नुसती गोष्ट नाहीं, ती केवळ कहाणी नाही, कला या दृष्टीनें तिचें कवितेशीं फार साम्य आहे, हें ज्यांनीं मराठी वाङ्मयात प्रथमतः सिद्ध करून दाखविलें अशा वीस पंचवीस वर्षांपूर्वी उदयाला आलेल्या विरळ कलावंतांपैकीं या कथेचे लेखक ' दिवाकर कृष्ण ' हे एक आहेत. एकाच भावनेचा मोठ्या हळुवारपणानें केलेला परिपोष त्या भावनेच्या सौंदर्यांत भर घालील अशी कोमल शब्दांनीं आणि लहान लहान सूचक वाक्यांनीं वेधक वाटणारी भाषाशैली, अगदीं स्वाभाविक रीतीनें कथेशीं एकजीव होऊन जाणारें पोपटाचें प्रतीक, इत्यादि गोष्टींनीं या लघु-कथेंतल्या करुणरसाचा काव्यातल्या प्रमाणेंच कसा उत्कर्ष केला आहे तें पाह-ण्याजोगें आहे. पैशाच्या पाठीमागें पळत सुटल्यामुळें माणसें मायेवर जगतात हें विसरून गेलेला बाप व वात्सल्याला मुकलेला त्याचा हळव्या मनाचा एकुलता एक आईवेगळा मुलगा ! या दोघाच्या भावनांतला विरोध हाच या लघुकथेचा आत्मा आहे. लेखकाची दृष्टि अशी काव्यात्म व कलापूर्ण असल्यामुळें तिची रचना रेखीव वाटते. तिचा आरंभच पहाना ! वायफळ असें एक वाक्यसुद्धा त्यात कुठें आढळणार नाहीं. या पितापुत्राचा परिचय करून द्यायचें आणि त्याच्या स्वभावावर प्रकाश टाकायचें काम पहिल्या पांच ओळींतच लेखकानें चातुर्यानें पार पाडलें आहे. हा आरंभ असा आहेः*

*' पोपट, आंत जाऊं नको बरं ! भाई रागावतील ! '*

शेठ नानूभाई यांच्या घरापुढील अंगणांत एक सहा वर्षांचा बालक हातांत लांकडाचा एक हिरवा पोपट घेऊन उभा होता. ऑफिसमध्यें भाईसाहेब आपल्या दोन कारकुनांबरोबर लांब लांब कागद घेऊन कामें करीत बसले होते. डाव्या बाजूच्या दरवाजांतून एक गतधवा तरुणी त्या बालकाला हा मनाई हुकूम सोडीत होती.'

कथेच्या आरंभाप्रमाणें तिचा शेवटहि सूचकतेनें पण परिणामकारकतेनें करण्याचें लेखकाचें कसब डोळयात भरल्यावाचून राहत नाहीं. बापाच्या सहवासासाठीं, त्याच्या वात्सल्ययुक्त हस्तस्पर्शासाठीं, आजारात त्याच्या मांडीवर डोकें ठेवण्यासाठीं आसावलेल्या पोपटाला तें सुख कांहीं केल्या मिळू शकत नाहीं. पैशाच्या व्यवहारांत, मोटमोठ्या उलाढालींत त्याच्या पित्याचें मन आणि हात अष्टौप्रहर गुंतलेले असतात. पितृप्रेमाची साधीसुधी भूक तृप्त न होताच पोपट हें जग सोडून जातो. त्यानंतरचें वर्णन लेखकानें असें केलें आहे—

'लांकडाचा हिरवा पोपट झोंपाळ्यावर पडला होता. पिंजरा रिकामा पिंजरा गॅलरींत टांगला होता. सगळ्या घरात उदास होतें. नर्मदा रडत होती. भाईसाहेब हातावर डोकं टेवून बसले होते. त्यांना आपल्या पत्नीची आठवण झाली. 'पोपटला सांभाळा' अशी तिची विनंति होती. पोपट कुठें आहे? पोपट उडून गेला.

संध्याकाळ झाली होती. रस्त्यांतून मोटारीची जा-ये सतत चालली होती. म्युनिसिपल शाळेंतील मुलांनीं फाटकासमोर उभे राहून हांक दिली—पोपट—'

"पोपट, आंत ओऊं नको बरें; भाई रागावतील!"

शेट नानूभाई यांच्या घरापुढील अंगणांत एक सहा वर्षांचा बालक हातांत लांकडाचा एक हिरवा पोपट घेऊन उभा होता. ऑफिसमध्यें भाईसाहेब आपल्या दोन कारकुनांबरोबर लांब लांब कागद घेऊन कामें करीत बसले होते. डाव्या बाजूच्या दरवाजांतून एक गतधवा तरुणी त्या बालकाला हा मनाई-हुकूम सोडीत होती.

मुंबईतील गिरगांव बॅकरोडवरील एक बंगला भाईसाहेबांनीं स्वतःकरितां १९०८ सालीं विकत घेतला. या बंगल्याचा एक विशेष हा होता कीं, त्याच्या-पुढें एक त्रिकोणी अंगण ठेवलें असून, त्याच्या दोन्ही बाजूंनीं तिमजली इमारत उभी होती व तिसऱ्या बाजूनें भिंतीचा सुमारें एक पुरुषभर कठडा असून, मध्यें त्याला एक फाटक होतें. त्या अंगणाला गुळगुळीत शहाबादी दगडाची फरशी केलेली असून फाटकांतच चढावयाला चार पायऱ्या होत्या.

नानूभाई हे मुंबईच्या दलालाच्या धंद्यात एक निष्णात गृहस्थ होते. यांचा जन्म बारडोलीस झाला होता. वडिलांच्या नौकरीमुळें ते जे एकदां मुंबईला आले, ते बारडोलीचें नाव देखील विसरले. नानूभाईचे वडील आमरण एका पेढीवर कारकून होते. त्यानीं बरीच इष्टेट भाईसाहेबाना ठेवली होती. त्यांच्या समजुतीप्रमाणें आपल्या जातीच्या एका कुलीन वधूबरोबर त्याचा विवाह लावून दिला होता. गिरगावात एक घर विकत घ्यावयाला आपल्या अंतसमयीं त्यांनीं सांगून ठेवलें होतें. त्याप्रमाणें विकत घेतलेलें हेंच वर सांगितलेलें घर होय. अशा रीतीनें १९०८ सालीं भाईसाहेबाचा संसार सुरू झाला. भाईसाहेबांची मनोवृत्ति--लोक म्हणतात, आजन्म मुंबईत राहिल्यामुळें--एका विशेष प्रकारामुळें व्यापारी बनली होती. कांहीं वर्षांनीं त्याना एक पुत्ररत्न झालें. पण सर्व संसारांत त्यांची वृत्ति अनासक्त होती. वैराग्यामुळें नव्हे, हें खास; पण दुसऱ्या कशा-मुळें तेंहि सांगता येत नाहीं. पण बायकामुलांना घरांतल्या कर्त्या मनुष्यानें आपली ज्या प्रकारें विचारपूस करावीशी वाटते, तशी ते करीत नव्हते, एवढें मात्र खरें.

भाईसाहेबानीं पत्नीच्या—त्यांचें नांव माझ्या लक्षांत नाहीं, लोक त्यांना 'बाई' म्हणत, हें त्याचें माहेरचें नांव होतें एवढें मला आठवतें—अंगावर सर्व जबाब-दारी टाकली होती. भाईसाहेबांना त्यांचा स्वतःचा व्यवसायच पुरेसा होई. महिन्याकांठीं पत्नी मागेल ती रक्कम त्यांच्याकडे ते देत. नोकराचाकरांकरवीं 'बाई' सर्व कामें करवीत. एकदां स्नानाला, दोनदां न्हाफराळाला, दोनदां जेवणाला व रात्रीं फार उशीरानें निजावयाला भाईसाहेब डाव्या बाजूच्या इमा-रतींत येत. पेढीचें सर्व काम ते स्वतः आपल्या नजरेखालीं करून करीत व त्याचें फळ म्हणजे त्यांची वाढती सधनता होती. घरांत कोणी आजारी पडलें तर ते डॉक्टरला बोलावण्यास सांगत. खुद्द रोग्याजवळ त्याच्या आजाराची प्रत्यक्ष

चौकशी त्यांनीं कधींच केली नाहीं. स्वतःच्या मुलाला देखील त्यांनीं कधीं उचलून घेतलें नाहीं.

आपल्या लाडक्या मुलाचें लाडकें नांव बाईनीं पोपट असें ठेवलें होतें. छोटा पोपटलाल आनंदी गडी होता. त्याला पोपटाची फार आवड असे. गॅलरींत पितळी पिंजऱ्यांत त्याचा आवडता पोपट टांगला होता. त्याच्या हातांत लांकडी हिरवा पोपट होता. घरांतल्या मंडळीचा आवडता पोपट अंगणांत खेळत होता. नर्मदामावशींनीं त्याला कशिद्याचा एक पोपट काढून दिला होता. म्युनिसिपल शाळेंतील ओळखीचीं मुलें पोपटलालला जातां येतां हाक मारीत "पोपट."

पोपटला फाटकाच्या बाहेर जाण्याची बंदी होती. अंगणाच्या आकुंचित क्षेत्रांत पोपट स्वच्छंदपणें, स्वतंत्रपणें वागडत असे.

१९१८ सालच्या इन्फ्लुएंझामध्येंच बाईचा प्रसूतिकाल दुर्दैवानें आला. तापामुळें त्यांना अकालीं प्रसूति होऊन त्यांचें दुखणें विकोपास गेलें. मुंबईच्या सर्व डॉक्टरांच्या अगदीं समोर पण पतींचें दर्शन न घेता बाईनीं इहलोकचा संसार संपविला. भाईसाहेबाना दुखणाइताजवळ बसणें आवडत नसे. ते आपल्या खोलींत जाऊन बसले. त्यांना यावयाला एक मिनिट उशीर लागला. इहलोक सोडून जाताना बाईनीं नर्मदेला पोपटला सांभाळण्याला सांगितलें. बाई कायमच्या गेल्या. नर्मदेला रडता घर थोडें झालें. बहिणीबहिणींचा अगदीं एकजीव असे. त्या दिवशीं पोपटला शेजारच्या घरांत खेळावयाला नेलें होतें. पोपट ऐनवेळेस धांवत आलाच व त्यानें आपल्या जात्या मातेचें शेवटचें दर्शन घेतलें. मातेला मात्र मुलाचें दर्शन झालें नाहीं. पोपटची समजूत होती, आईला चौघांनीं उचलून दवाखान्यांत नेलें. अनेक वेळां तो नर्मदेला विचारी, "आई केव्हां ग दवाखान्यांतून परत येणार ?" बिचाऱ्या नर्मदेला रडूं कोसळे !

नर्मदा त्यानंतर लौकरच आपल्या घरीं गेली. तीन महिन्यांनीं नर्मदा परत आली तिच्या कपाळीं कुंकू नव्हतें. आल्याबरोबर पोपटनें विचारलें, "नर्मदामावशी, कुंकू लावण्याला विसरलीस होय ?" नर्मदेच्या नेत्रांसमोर सूर्य फिरूं लागले. नर्मदेच्या सासरचीं सर्व माणसें सांथींत संपलीं. निराधार नर्मदेला भाईसाहेबांनीं आपल्या घरीं आणून ठेवलें. दोन वर्षांत भाईसाहेबांच्या वृत्तींत कांहीं हे फरक पडला नाहीं. त्यांची पोपटशीं, नर्मदेशीं, इतरांशीं वागणूक अगदीं

पूर्वींसारखी होती. नर्मदेला एकच आश्रय होता. एकच करमणूक होती. ती पोपटला जीवाभावानें जपत असे. म्हणच आहे " माय मरो; पण मावशी जगो. "

पोपटला भाईसाहेबांच्या ऑफिसांत जाण्याची इच्छा होती. त्यांना तो आपला हिरवा लांकडी पोपट दाखविणार होता. भाईसाहेब कामांत गुंतले होते. महत्त्वाचे कसलेसे कागद चाळून कारकुनाना ते कांहीं सांगत होते. अशा वेळीं त्याला कसचा वाव मिळतो? अर्ध्या तासापासून पोपट ऑफिसच्या दरवाजासमोर उभा होता. त्याला वाटत होतें, आता नाहीं मग भाईसाहेब आपल्याला आंत बोलावतील. मग आपण त्यांना लाकडी पोपट दाखवूं. भाईनीं त्याला आंत बोलावलें नाहीं. नर्मदा इतक्यात कशालाशी बाहेर आली. आरंभीं सांगितलेली प्रेमाची मनाई तिची होती.

" नको जाऊं? भाई कामांत आहेत होय? त्यांचें काम केव्हां संपेल? त्याना मी बाजारांतून पोपटाला डाळिंबे आणायला सांगणार आहें!"

" संध्याकाळीं भाई जेवायला आले म्हणजे सांग बरं त्याना!" फडफड असा आवाज झाला. पितळेच्या पिंजऱ्यांतल्या पोपटानें पंख झाडले.

" मावशी, आज पोपटाला डाळ का नाहीं दिली ग?" पोपट पिंजऱ्यांतल्या वाटींत पाहून म्हणाला.

" स्वतःला पाहिजे असेल म्हणून पोपटाची इतकी काळजी चालली आहे."

नर्मदेला १९१८ च्या चैत्रांतली आठवण झाली. हळदीकुंकवाकरितां भिजवलेली डाळ पिंजऱ्यांतल्या पोपटाला देण्याच्या मिषानें अंगणांतला पोपटच खात असे. कितीदां तरी नर्मदेनें पोपटला आपल्या चिमुकल्या हातानें सर्वांची नजर चुकवून डाळीचा बोकणा भरतांना पकडलें होतें. पोपटला आज दुपारचं। वाळवाटी भिजलेल्या डाळीची मिळाली. पिंजऱ्यांतल्या पोपटाचाहि त्यांत वांट। होता. शेजारचा बनशी पोपटशीं खेळायला आला. पिंजऱ्यांतल्या पोपटाचें पोपटनें आवडतें नांव 'लाल' असें ठेवलें होतें. संध्याकाळ झाली होती. रस्त्यांतून मोटारगाड्यांची जा-ये चालली होती. म्युनिसिपल शाळेतील मुलांनीं फाटकासमोर उभें राहून हांक मारिली—" पोपट!"

त्या दिवशीं भाईसाहेब काम संपवून घरीं येईपर्यंत पोपटची मध्यरात्र झाली. नर्मदा मधल्या घरांत विचार करीत बसली होती. तिला ब्रह्मांड आठवत होतें.

पोपट आपल्या बिछान्यावर निश्चिंतपणें घोरत होता. दुसऱ्या दिवशीं पाडवा. नर्मदेनें पोपटकरितां नवी पाटी आणवली. नवी पाटी घेऊन पोपट घरभर हिंडत होता. पोपटला आज नव्या वर्षाचा नवा आनंद झाला होता. भाईना पाटी दाखविण्याकरितां पोपट ऑफिसच्या दारांत गेला. "भाई नाहींत!" भाई आकस्मिक कारणामुळें अहमदाबादला गेले होते. त्यानें कारकुनाला विचारलें, "भाई केव्हां हो परत येतील?"

"उद्यां संध्याकाळीं!"

दुसऱ्या दिवशीं पोपट नर्मदेला म्हणाला, "रात्रीं भाई उशीरानें आले तरी मला उठीव हं; मी त्यांना माझी नवी पाटी दाखवणार आहें!"

नर्मदेकडून रुकार मिळाल्यावर तो आपल्या आवडत्या लालची विचारपूस करण्याकरितां बाहेर गेला. त्या रात्रीं भाई परत आले नाहींत. दुसऱ्या दिवशींहि आले नाहींत. तिसऱ्या दिवशीं सकाळीं दहा वाजतां भाईसाहेब आपल्या फाट-कांत उतरले. पोपट धांवतच त्यांच्याकडे गेला. "भाई, आधीं घरांत या. मला एक छानदार हिरवा पोपट आणला आहे."

भाई पोपटशीं बोलले नाहींत. एक अक्षरहि न बोलतां ते तडक आपल्या ऑफिसमध्यें गेले आणि बरोबर आलेल्या गृहस्थाशीं दोन तास खलबत करीत बसले. बऱ्याच मोठया रकमेचें एक प्रकरण अंगावर आल्यामुळें नानू-भाई अगदीं अस्वस्थ झाले होते. त्यांना पुढें चार दिवस एका क्षणाचीहि फुरसद मिळाली नाहीं. सारखे मोटारींतून खेटे घालीत होते पांचव्या दिवशीं पोपटच्या लांकडी पोपटाची त्यांना आठवणहि झाली नाहीं. पोपटला राग आला होता. त्यानें भाईशीं आपण होऊन बोलावयाचें नाहीं असा निश्चय केला होता.

एका रात्रीं पोपटला ताप भरला. नर्मदेला कसेंसेंच वाटूं लागलें. आजपर्यंत त्याला अनेकदां ताप आला होता; पण आज नर्मदेला विनाकारण हुरहूर वाटूं लागली. पोपटला दुसऱ्या मजल्यावरच्या रस्त्याकडल्या खोलींत निजविलें होतें. त्याला आज फोनोग्राफचें गाणें ऐकावयाची इच्छा झाली. नर्मदा त्याच्याकरितां रेकॉर्ड लावीत होती. मध्येंच पोपटनें विचारलें, "भाई माझ्यावर रागावले आहेत का ग?"

'नाहीं बाळ, रागवायला काय झालं?"

" होय. आणि तूं पण माझ्यावर रागावली आहेस. सगळे लोक माझ्यावर रागावले आहेत!"

" कुणी सांगितलं तुला?"

" मला आपलें वाटतें उगीच!"

नर्मदा आंत गेली. पोपट खिडकींतून बाहेर पाहूं लागला. बनशी इतर मुलांबरोबर शाळेला जात होता. " बनशी, बनशी!" पोपटनें हांक मारली. बनशीला हांक ऐकूं गेली नाहीं. तो तसाच पुढें गेला. " सगळे लोक माझ्यावर रागावले आहेत!" पोपट स्वतःशींच म्हणाला. त्याला आज आईची आठवण झाली. नर्मदा खोलींत आली, तिला त्यानें विचारलें, " मला आई केव्हां ग भेटेल?"

" भेटेल अं बाळ!"

नर्मदा दुसरें काय उत्तर देणार? त्याची आई परत येण्याकरितां गेली नव्हती. पोपट उठून बाहेर जाऊं लागला.

" कुठें जातोस?"

" भाईकडे!"

" थांब, भाईनाच इथं बोलावतें अं!" नर्मदा बाहेर गेली. तिनें नोकराबरोबर निरोप पाठविला, ' पोपट बोलावतो आहे.' भाई ऑफिसांत नव्हते. भाई परत आल्यावर नोकरानें निरोप कळविला.

" कशाला बोलावतो? त्याला म्हणावें सध्यां काम आहे, थोड्या वेळानें येईन."

थोड्या वेळानें भाईसाहेब यावयाला विसरले. पोपटचा ताप वाढतच होता. कांहीं केल्या ताप उतरत नाहीं, असें पाहून डॉक्टरांच्या सल्ल्यानें नर्मदा त्याला घेऊन माथेरानला गेली. तिथें मोटारगाड्यांची सतत जा-ये नव्हती. तिथें म्युनिसिपल शाळेंतील मुलें फाटकासमोर उभीं राहून पोपट म्हणून हांक देत नव्हतीं. पोपटच्या प्रकृतीला सुधार म्हणून पडला नाहीं. तिसऱ्या दिवशीं त्याला भ्रम झाला. बेशुद्धींत तो बडबडत असे, " भाई!—सगळे लोक माझ्यावर रागावले आहेत."

नर्मदेनें भाईसाहेबांना लिहून कळवलें, " बाळ आपली फार आठवण काढतो आहे, एकदां येऊन जा!"

आई अंतरली; बाप परका झाला; पोरानें धास्ती खाल्ली. तो म्हणूं लागला, " माई ! तूं नाहीं ना माझ्यावर रागावलीस ? "

भाईसाहेबांनी जाण्याची दिरंगाई केली. दुसऱ्या दिवशीं तार आली, " Come over at once " (एकदम निघून या). भाईसाहेब गेले. पोपटनें त्यांना ओळखलें नाहीं. " सगळे लोक माझ्यावर रागावले आहेत " हा त्याचा एकच महामंत्र होता. पांचव्या दिवशीं घरांतल्या पितळी पिंजऱ्याचा दरवाजा नोकरांनीं निष्काळजीपणानें उघडा टाकला. त्यातला पोपट जो एकदां उडाला तो पुनः सांपडला नाहीं ! जवळ जवळ त्याच वेळीं पोपट आपल्या कुडीचा पिंजरा फोडून उडून गेला ! तो पुनः परत आला नाहीं.

भाईसाहेब नर्मदेला घेऊन परत मुंबईला आले. लांकडाचा हिरवा पोपट झोपाळ्यावर पडला होता. पितळेचा रिकामा पिंजरा गॅलरींत टांगला होता. सगळ्या घरांत उदास होतें. नर्मदा रडत होती. भाईसाहेब हातावर डोकें ठेवून बसले होते. त्यांना आपल्या पत्नीची आठवण झाली. 'पोपटला सांभाळा' अशी तिची विनंति होती. पोपट कोठें आहे ? पोपट उडून गेला ! !

संध्याकाळ झाली होती. रस्त्यांतून मोटारींची जा-ये सतत चालली होती. म्युनिसिपल शाळेंतील मुलांनीं फाटकासमोर उभें राहून हांक दिली—" पोपट! "



## अभ्यास

( १ ) या गोष्टींतल्या नानुभाईचें स्वभावचित्र तुमच्या शब्दांत लिहा.

( २ ) दिवाकर कृष्णांप्रमाणें साने गुरुजींच्या लिखाणांतहि छोटीं छोटीं वाक्यें वापरून विशिष्ट परिणाम साधण्याचा प्रयत्न केलेला असतो. या दोघांच्या अशा प्रकारच्या रचनेची तुलना करा. कोणती रचना तुम्हांला अधिक सरस वाटते व तीं कां तें सांगा.

( ३ ) या कथेंतल्या मुलाचा मृत्यु ही एक कृत्रिम घटना आहे असें कित्येक टीकाकारांचें म्हणणें आहे. या युक्तीचा आश्रय न करितां कथेचा विकास करायचा असला तर तुम्ही तो कसा कराल?

( ४ ) 'अंगणांतला पोपट ' या कथेंत कवितेप्रमाणेंच शब्द-संगीत व रसपरिपोषक वातावरणाची निर्मिती आढळून येते. या विधानाची सोदाहरण चर्चा करा.



## महापुराची शिकवण ३

### परिचय

मुखठणकरांच्या या गोष्टीचे दोनतीन विशेष मोठे आकर्षक आहेत त्यांतला पहिला गोमंतकांतल्या पार्श्वभूमीवर ही कथा लिहिली गेली आहे हा होय.एखाद्या सुंदर चित्राची आकर्षक चौकट म्हणून या पार्श्वभूमीचा लेखकानें उपयोग केलेला नाहीं हे लक्षात घेण्याजोगें आहे. गोमंतकांतलें जीवन, तिथलीं सुखदुःखें, तिथलें वातावरण, या सर्वांमुळें ही पार्श्वभूमि नुसती शोभादायक न राहतां सजीव झाली आहे. या कथेतला प्रश्न फार व्यापक व महत्त्वाचा आहे. हा तिचा दुसरा विशेष। वैयक्तिक भावनांवर, कौटुंबिक वडामोडींवर आणि व्यक्ति विरुद्ध समाज अशा संघर्षावर आधारलेल्या चांगल्या सामाजिक कथा आपल्याकडे लिहिल्या जातात. पण दोन भिन्न धर्मांच्या समाजांनीं एकत्र सुखासमाधानानें नांदलें पाहिजे, त्यांच्यांत संघर्ष व संग्राम असतील तर ते नाहींसे कसे होतील, अशा विषयाला सहसा कुणी कलावंत हात घालीत नाहीं. हिंदु आणि मुसलमान यांच्याविषयीं आपले ललित लेखक जें काही क्वचित् लिहितात तें बहुधा कल्पनारम्यतेंतूनच स्फुरलेलें असतें. मुखठणकरांची ही गोष्ट तशी नाहीं हा तिचा मोठा गुण आहे. तिच्यात आशावाद आहे, उदात्तता आहे; मनुष्याच्या चांगुलपणाची साक्ष आहे. पण त्याबरोबरच तिच्यांत वस्तुस्थितीचें प्रामाणिक चित्रणाहि आहे. दोन भिन्न धर्मांच्या समाजांतली भांडणें अज्ञानांतून, मूर्खपणांतून, गैरसमजांतून किंवा क्षुल्लक कारणांतून कशीं उद्भवतात आणि मग माणसें अहंकाराला बळी पडून आणि माणुसकीकडे पाठ फिरवून एकमेकांपासून दूर कशीं जातात याचें या कथेतलें चित्रण मार्मिक आहे. एकमेकांपासून दुरावलेल्या या हिंदु व खिस्ती कुटुंबांतली

*माणुसकी मृत्यूच्या दारांत कशी जागृत होते हेंहि लेखकानें फार चांगल्या रीतीनें दाखविलें आहे. या कथेचा शेवटचा भाग कोणत्याहि चित्रपट-दिग्दर्शकानें मोठ्या हौसेनें चित्रित करावा असा प्रसंगपूर्ण, गतिमान आणि रसमय आहे.*

*'अंगणांतला पोपट' या कथेसारखी हिची रचना रेखीव नाहीं. हरिभाऊ आपट्यांच्या काळांतल्या गोष्टींप्रमाणें ती थोडी स्वच्छंदी शैलीनें लिहिली गेली आहे. असें असूनहि विषयाची विशालता, कथेच्या शेवटच्या प्रसंगांतली नाट्यपूर्णता आणि लेखकाची समरसता यांच्यामुळें तिच्या परिणामकारकतेला बाध आलेला नाहीं. मधून मधून आलेल्या प्रादेशिक शब्दांनीं आणि वर्णनांनीं कथेच्या रंगतींत कशी भर पडली आहे, हें पाहणेंहि मोठें मौजेचें आहे.*

सांतुशणे व पावलु-द-सा या दोघा शेजाऱ्यांमध्यें उत्पन्न झालेल्या बखेड्याची बातमी जेव्हां बाहेर फुटली, तेव्हां प्रथम ती कोणासहि खरी वाटेना! पण कांहीं दिवसांनीं प्रत्यक्ष त्या दोघांच्या तोंडूनच गावातल्या चव्हाट्यावर एकमेकाची नालस्ती होऊं लागून तिला पुष्टि मिळतांच तिच्यावर विश्वास ठेवण्यावाचून लोकाना गत्यंतर नव्हतें! सबंध फुलगांवांत तो एक मोठाच कुतुहलाचा व विस्मयाचा विषय होऊन बसला! आणि साहजिकच आहे! त्या दोघांचीहि घराणीं फुलगांवांत इतकीं प्रतिष्ठित व खानदानीचीं म्हणून नाणावलेलीं होतीं कीं, कोमुनिदादींतील उलाढाली असोत, गावांतल्या कज्जेकफावती असोत, भाटकरंमुणकाऱ्यांमधील बेबनाव असोत किंवा एखाद्या गांवकऱ्याच्या घरीं उद्भवलेली बरीवाईट कौटुंबिक भानगड असो, तेथें सांतुशणे व पावलु-द-सा यांच्या सल्ल्याशिवाय पान हलावयाचें नाहीं, अशी त्या गावांत स्थिति होती. शिवाय सातुशणे हा हिंदु व पावलु-द-सा हा क्रिस्तांव असला, तरी त्या दोघांच्याहि कुटुंबामध्यें पिढ्यानुपिढ्या इतका जिव्हाळ्याचा घरोबा व सलोखा चालत आलेला होता कीं, त्यामध्यें कधींकाळीं बिघाड येईल, अशी कोणी कल्पनाहि केली नसती. तशांत इतक्या भक्कम पायावर उभारला गेलेला या दोघां शेजाऱ्यांमधील स्नेह ढांसळण्यास कारण झालेली गोष्ट तरी किती क्षुल्लक!

सांतुशणेचा नातू सोनू हा या भांडणाचें मूळ! केवळ सांळासतरा वर्षांचा

कोंवळा पोर ! पण आजोळी येऊन दोनचार दिवस झाले नाहींत, तोंच त्यानें ही एवढी आग पेटवली !

पण एका अर्थी सोनू म्हणजे कांहीं सामान्य व्यक्ति नव्हती. त्याचें घर 'गोव्यातलें पुणें' म्हणून प्रसिद्ध असलेल्या एका मोठया शहरांत असल्यामुळें तेथील वाचनालयें, व्याख्यानमाला, सार्वजनिक विषयचर्चेचे अड्डे, इ. गोष्टींच्या लाभानें विविध प्रकारचें अर्धेकच्चें ज्ञान डोक्यांत कोंबलें जाऊन अकालपांडित्य प्राप्त झालेल्या शहरांतील तरुण मुलांचा तो एक उत्तम नमुना होता. लागोपाठ स्थापन होऊन लयाला गेलेल्या विद्यार्थ्यांच्या पांचसहा 'संघां'ची व 'मंडळां'ची चिटणिशी त्याला लाभली होती. इतकेंच नव्हे तर अलीकडे शहरांत भरणाऱ्या बऱ्याच स्थानिक सभा व व्याख्यानांमधून अनुमोदक, सूचक व आभारक होण्याचा मानहि त्यास हळूहळू मिळूं लागून एक होऊं घातलेला 'दे० भ०' म्हणून त्याची सर्वांकडून चहा होऊं लागली होती !

या सर्व गोष्टींचा परिणाम अर्थात् असा झाला कीं, असा एकहि राजकीय, धार्मिक किंवा सामाजिक प्रश्न नव्हता कीं, त्याचें संपूर्ण ज्ञान स्वतःस झालें आहे, असें त्यास वाटत नसे !

विशेषतः गेले कित्येक महिने उत्तर हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं झालेल्या हिंदु-मुसलमानांमधील दंग्यासंबंधींची वर्तमानपत्रांतून आलेलीं वर्णनें व लेख वाचल्यापासून 'परधर्मीयांचें हिंदुधर्मावरील आक्रमण' हा विषय त्याच्या फारच जिव्हाळ्याचा बनला होता. कोठेंहि क्रिस्तावांची एखादी धार्मिक मिरवणूक, एखादें चर्च किंवा नुसता एखादा काळा झगलेवाला पाद्री दृष्टी-समोरून गेला कीं पुरे ! गोव्यांतील हिंदु-क्रिस्तांवांमधील परस्परसंबंधांचें हृदय-द्रावक दृश्य आजूबाजूच्या श्रोत्यांपुढें उभें करण्यासाठीं सोनूचें मग आवेशयुक्त वक्तृत्व सुरू झालेंच ! ब्रिटिश महाराष्ट्रांतील कांहीं ठराविक वर्तमानपत्रांतील हिंदु-मुसलमानांच्या प्रश्नासंबंधीं येणारे लेख त्यानें इतके आत्मसात् करून घेतले होते कीं, कोणत्याहि घटकेला अशा वक्तृत्वाला लागणारी सामुग्री त्याच्या जिभे-वर अगदीं तयार असे. फक्त त्या लेखांतील 'मुसलमान' या शब्दाऐवजीं 'क्रिस्तांव' या शब्दाची योजना करण्याची त्यास खबरदारी घ्यावी लागे एवढच !

फुळगांवांत आल्यापासून तर आपल्या या आवडत्या विषयावरील सोनूच्या

वक्तृत्वास फारच ऊत आला! गोव्यांतील शहरांमधील हिंदु व क्रिस्तांव या समाजांत राजकीय क्षेत्रातील स्पर्धेमुळें व क्रिस्तांवांच्या पाश्चात्त्य धर्तीच्या राहाणीमुळें जो परस्परांविषयीं विषमभाव व थोडाबहुत अलगपणा दिसून येतो, तो त्या कारणांच्या अभावीं फुलगांवासारख्या खेडेगांवांत अस्तित्वांत असणें शक्य नव्हतें. अर्थात् तेथें या दोन्ही समाजांमध्यें आढळून येणारें आपुलकीचें दळणवळण म्हणजे हिंदुसमाज स्वतःवर ओढवून घेत असलेलें मोठेंच अरिष्ट असें सोनूला वाटावें व 'भयाचें बिगूल' वाजवून तेथील हिंदूंना जागवण्यासाठीं व त्यांना आक्रमणशील बनवण्यासाठीं त्यानें चंग बांधावा यात नवल नाहीं.

सांतुशणैच्या घरीं बल्कांवांवर दररोज गांवांतील बरीच वृद्ध मंडळी संध्याकाळच्या वेळीं शिळोप्याच्या गप्पांमध्यें घटकाभर मन रिझवण्यासाठीं जमत असे. आजवर आपल्या विद्वान् नातवाच्या पांडित्याचीं ज्यांच्या त्यांच्याकडे केलेलीं वर्णनें कधीं खोटीं नाहींत, हें दाखवण्यासाठीं केव्हां एकदां त्याच्या ज्ञानाचें व हुषारीचें या मंडळीमध्यें प्रदर्शन करीन असें सांतुशणैस झालें होतें. त्यामुळें या बैठकीमध्यें सोनूचा प्रवेश व्हावयाला मुळींच उशीर लागला नाहीं. एकदोन दिवसांतच तेथील श्रोतृसमुदायावर त्यानें आपली बरीच छाप बसवली व त्याची आपल्या ठराविक आवडत्या विषयावरील व्याख्यानें हा एक या बैठकीतील महत्त्वाचा दैनिक कार्यक्रम होऊन बसला.

उज्ज्वल आर्यसंस्कृति, सनातन हिंदुधर्म, धर्मवेडे मुसलमान व पोर्तुगीज, वास्को द-गामा, जेजुइट्स, इन्क्विझिशन, अवरंगजेब, झिजीयाकर, स्वामी दयानंद, आर्यसमाज, हिंदु हुतात्मे, अशा निरनिराळ्या महत्त्वाच्या मुद्यांवरील त्याचें जळजळीत वाक्पांडित्य ऐकण्यांत त्याचे श्रोते इतके तल्लीन होत कीं, एखादे वेळेस गुडगुडी ओढणेंसुद्धां ते अजिबात विसरून जात!

पण हिंदुधर्मावरील त्याचीं प्रवचनें दररोज तल्लीनतेनें ऐकावीं, गामानें केलेल्या हिंदूंच्या प्राणाहानीची व दिओग रुद्रीगिशनें जमिनीला मिळवलेल्या देवळांचीं हृदयभेदक वर्णनें त्याच्या तोंडून ऐकून दुःखनिश्वास सोडावे, 'हिंदु तितका मेळवावा। विधर्मी तितका लाथाडावा।' या सूत्रावर, किंबहुना या सूत्रांच्या उत्तरार्धावरच आधारलेल्या त्याच्या उपदेशाला माना डोलवाव्या. मात्र सांतुबाबाच्या बल्कांवांवरील बैठक बरखास्त होऊन घराकडे वळतांच वाटेंत पावलूच्या व आजूबाजूच्या आणखी दोघातिघां क्रिस्तांव शेजाऱ्यांच्या बल्कांवां-

वर आळीपाळीनें थारवून पाहुणचारादाखल त्यांजकडून मिळणाऱ्या शंतांच्या विडीचें बोटांच्या पकडींत न राहण्याजोगें थोटूक होईपर्यंत परस्परांच्या दैनिक सुखदुःखांचा, नित्याच्या जिगरदोस्तीच्या सलगीनें खल करण्याच्या कामीं चुकूनहि खंड पडूं दऊं नये, असा उपड्या घागरीवर पाणी हाच या वृद्ध मंडळीच्या बाबतींत सोनूला अनुभव आला!

अखेरीस फुलगांवांतील लोक हिंदुधर्माच्या लढ्याचें महत्कार्य शिरावर घेण्यास कितपत तयार आहेत, ही गोष्ट एकदांची धसास लावून पाहाण्याच्या इराद्यानें एक दिवस त्यानें हा प्रश्न मोठ्या कळकळीनें पण रोखठोक त्यांजपुढें मांडला व गोव्यांतील हिंदुसमाजानें यापुढें बेसावध न राहतां ख्रिस्त्यांविरुद्ध चढाईचें धोरण स्वीकारणें कसें अवश्य आहे, याचें मुद्देसूद प्रतिपादन करून फुलगांव-करांनीं इतर ठिकाणच्या हिंदुसमाजाला या बाबतींत धडा घालून देण्याचें श्रेय घ्यावें, अशी आपल्या श्रोत्यांस आग्रहाची विनंति केली!

येथवर मजल आल्यावर मात्र त्यांपैकीं कित्येकांस बराच पेंच पडला! एक-दोघांनीं कशी तरी वेळ मारून नेण्यासाठीं त्याच्या म्हणण्याला नुसती मान तुकवली! कांहीं जणांनीं ती गोष्ट हंशावारी नेण्याचा प्रयत्न केला! एका धूर्त इसमानें, "सोनूबाबाच्या उपदेशाप्रमाणें आपण सर्वांनीं अवश्य वागलें पाहिजे! नाहींतर हिंदुधर्मांत जन्मल्याचें काय सार्थक? सध्या बरसातीचे दिवस जवळ आले आहेत. लोकांना फुरसत नाहीं. पण हे दोनतीन महिने जाऊं द्या, कीं दसऱ्याच्या मुहूर्तावर करूं या पवित्र कार्याला आरंभ! देऊं बार उडवून!" इ. गोड शब्दांनीं या त्याच्या सूचनेची बोळवण केली. पण त्याच्यामध्यें फट-कळ तोंडाचा एक स्वमंग म्हातारा निघालाच! ब्रिटिश हिंदुस्थानातील हिंदु-मुसलमानांप्रमाणें गोव्यांतील हिंदु क्रिस्तावांमध्यें तंटेबखेडे झाल्याचें किंवा तेथील मुसलमानांप्रमाणें येथील ख्रिस्तांवांकडून हिंदूंवर अत्याचार झाल्याचें एकहि उदाहरण आपल्या सबंध हयातींत घडलें नसल्याचें त्यानें ठासून सांगितलें! आजवर आपले वाडवडील क्रिस्तांवांशीं गुण्यागोविंदानें वागत आले, तोच कित्ता पुढें गिरवण्याचा आपला निश्चय व्यक्त केला! व सोनूच्या त्या उप-देशावर पढतमूर्खत्वाचा शिक्का मारून लहान तोंडीं मोठा घांस घेणाऱ्या 'अजाणत्यांच्या पोरांत' तुच्छतापूर्वक त्याची गणना केली!

स्वतःचा व विशेषतः स्वतःच्या उच्च तत्त्वाचा अशा रीतीनें एका जुन्या-

पुराण्या गांवढळाकडून झालेला हा उपमर्द सोनूस थोडाच सहन होतो? त्याच्या अंगाचा तिळपापड उडाला! वादविवादाच्या आखाड्यांत उतरण्याचें त्यानं आपल्या प्रतिस्पर्ध्यास आव्हान दिलें! पण तें स्वीकारण्याचें त्या म्हाताऱ्याला कसचें धैर्य होतें? सोनूच्या तान्ह्या वयांत एकदां त्याला कडेवर घेतल्यावेळीं आपलें परीटघडीचें उपरणें त्यानें घाण केलें होतें, त्याचप्रमाणें दुसऱ्या एका वेळीं कांहीं खोडी केल्याबद्दल आपण त्याचा कान पकडला होता, इ० त्याच्या लहानपणींच्या संस्मरणीय गोष्टींच्या आधारें सिद्ध केलेल्या आपल्या वयाच्या श्रेष्ठत्वाची ढाल पुढें करून त्यानें सोनूशी थोडा वेळ वाचावाची तेवढी केली व नंतर सानुशगीच्या नक्कानावरून मागता पाय घेऊन शेजारच्या पावलूच्या बल्कांवाना आश्रय घेतला!

झालें! त्या दिवसापासून सोनूची बालंबाल खात्री झाली कीं, वठलेल्या झाडाच्या या जुन्या खोडांना कितीहि पाणी घातलें, तरी त्यांना पालवी फुटणें अशक्य! हिंदुधर्मानें भवितव्य अशा नेभळट खुंटावर अवलंबून ठेवणें ही घोडचूक होय! या कामीं आजच्या बालपिढीमध्यें तेजस्वितेचें बीजारोपण करणें हा एकच उत्तम मार्ग! कारण तेच समाजाचे भावी आधारस्तंभ! त्यांतूनच हिंदुत्वाची दिव्य पताका जगभर मिरविणारे उद्यांचे धर्मवीर निर्माण व्हावयाचे!

दुसऱ्या दिवसापासून सोनूनें आपलें कार्यक्षेत्र बदललें! बल्कावावरील अड्ड्याला कायमचा रामराम ठोकून, यापुढें घराच्या चौकीवर, अंगणांत व घरासभोंवतालील भागांत धांगडधिंगा घालणाऱ्या आर्यकुमारांमध्यें त्यानें आपलें प्रचारकार्य सुरू केलें!

हिंदुधर्माचा दिव्य संदेश त्यांच्या मनावर ठसविण्यासाठीं नव्या जोमानें त्यानें त्यांजपुढें आपल्या व्याख्यानांची फैर झाडतांच त्यांचा प्रभाव बा खेपेस लगेच प्रत्ययास आला. ज्यांचे आदर्श, कल्पनेच्या साहाय्यानें त्यांस इष्ट तो नवा घाट देऊन सोनू आपल्या वाणीनें रंगवीत असे, ते इतिहासकालीन व वर्तमानकालीन हिंदु हुतात्मे या फुलगावकर कुमारांच्या अंगांत संचरण्यास फारच थोडा अवधि पुरेसा झाला!

दोनतीन दिवस लोटले. एके दुपारीं सोनूचे दहाअकरा वर्षांचे मामेभाऊ गिरू व बाबलू व शेजारचे इतर बालश्रोते त्याच्याभोंवतीं गोळा होऊन, विजापूर शहरांतील मुसलमान कसायाचें डोकें उडवणाऱ्या बालशिवाजीचें आख्यान

मोठया उत्सुकतेनें श्रवण करीत होते! तें ऐन रंगांत आलें आहे, इतक्यांत त्यांच्याच वयाचा शेजारच्या पावलूचा नातु सांतान हा धांवत धांवत तेथें आला. जेमतेम ढुंगण झाकणाऱ्या एका आखूड विजारीशिवाय त्याच्या अंगावर कांहीहि नव्हतें. दिसेल न दिसेल, अशा एका पातळ थराशिवाय त्याच्या संबंध डोक्या-वरील केंस साफ कापलेले असल्यामुळें त्याचा जणुं गोटाच केल्यासारखा दिसे. त्याच्या निमगोऱ्या कातडीवर खुलून दिसणारी एक ठळक वस्तु म्हणजे त्याच्या गळ्यांतील सोन्याची सांखळी व तिच्यामध्यें गुंफलेला हस्तिदंती खुरीस. सुताच्या टोंकाला बांधलेलें एक फुलपांखरूं आज त्याच्या हातीं होतें व आपले क्रिस्तानी हेल काढून त्यानें तोंडानें एकसारखी वटवट चालविली होती त्याजकडे दृष्टि जातांच सोनूची वृत्ति एकदम गरम झाली. त्यानें आपलें भाषण थाबवलें व त्याजवर डोळे वटारले!

पण सांतान तेवढ्याला थोडाच डरतो? दुपारच्या वेळीं सांतुशणैच्या चौकी-वर येऊन भिसू व बाबलू याजबरोबर यथेच्छ धिंगाणा घालण्याचा त्याचा गेल्या कित्येक वर्षांचा वहिवाटीचा हक्कच होता! तेथें आल्यावर त्याला एकच निर्बंध पाळावा लागे! तो हा कीं, खेळताना भिसू व बाबलू यांना शिवून त्यांचे कपडे ओवळे करावयाचे नाहीत! पण तो त्याच्या इतका अंगवळणीं पडला होता कीं, खेळांत क्वचित् येणारा एखादा हातघाईचा प्रसंग सोडल्यास, हा निर्बंध त्याजकडून कधींहि मोडला जात नसे!

सांतुशणैच्या चौकीवर आज नेहमींहून जास्त सोबत्यांचा जमाव पाहून त्याला अधिकच हुरूप आला! आपल्या हातांतलि नवलाईची गंमत दाखवून त्या सर्वांचा तांडा स्वतःभोंवतीं गोळा करण्याच्या हेतूनें त्या फुलपांखरासहित गिरक्या घेत व तोंडानें बँडचा आवाज काढीत त्यानें एकसारखा नाचण्याचा सपाटा चालवला!

आतां मात्र सोनूचा संताप आवरेना! "पाहा! या शिखानष्टांना लहान-पणापासून किती दुष्ट वळण! हींच कार्टीं मोठीं झाल्यावर गोमातेच्या मानेवर सुरी ठेवायचीं! पाहा! पाहा! त्या प्राण्याचा कसा छळ चालवला आहे! कशाला हवी आहे या क्रिस्तांव पोरांची आम्हां हिंदूंच्या घरीं एवढी सलगी! द्या हांकलून त्या शिंच्याला!" तो त्वेषानें बोलला!

भिसू, बाबलू व त्यांचे इतर सोबती सांतानने आणलेलें फुलपांखरूं तेथें असले त्या सर्वांच्या समाईक मालकीचें ठरवावें असा त्याजपुढें ठराव मांड-

त्याच्या विचारांत होते; कारण फुलपांखरें पकडणें हा त्यांचाहि एक आवडीचा व्यवसाय होता !

पण सोनूचे शब्द कानीं पडतांच ते भानावर आले ! त्यांच्या अंगचें हिंदु रक्त उसळून आलें ! सांतानला न शिवण्याची खबरदारी घेऊन सारेजण त्याजवर तुटून पडले ! आपल्या सोबत्यांचा स्वतःवर झालेला हा अनपेक्षित गहजब पाहून सांतान बिचारा इतका घाबरून गेला कीं, तेथून पळून जात असतां भान न राहून भिसूला त्याचा धक्का बसला.

" सांतान शिवला ! भिसूला शिवला ! " सर्वांनीं एकच गिल्ला केला !

" आज शिवला, उद्यां तुमच्या तोंडांत मांस आणून कोंबलि पोरांनों ! " संतप्त झालेल्या सोनूच्या तोंडून हे धिःकारयुक्त शब्द निघाले !

या शब्दाचा योग्य तो सुपरिणाम लगेच घडून आला. भिसूनें थाडदिशीं सांतानच्या थोबाडीत लगावली ! इतरांनींहि त्याजवर सोडणें, ढलप्या, खडे, इ. हाताशीं मिळेल त्या अस्त्रांचा वर्षाव केला ! सांताननें एक दोन शेलक्या शिव्या उच्चारून रडत ओरडत आपल्या घराकडे धूम ठोकली. वीरश्रीच्या भरांत भिसूनें त्याचा पाठलाग चालवला. पण आपल्या घराच्या हद्दींत पोहोंचतांच सांताननें उलट खाली व जवळच पडलेलें एक हाडूक उचलून त्यानें त्वेषानें भिसूवर फेंकलें. नेम चुकून हाडूक भिसूवर न बसतां जवळच असलेल्या विहिरींत पडलें.

सांतुशणेच्या घराचें परसूं व पावलूच्या घराची बाग हीं एकमेकांना भिडलेलीं असून त्या दोहोंच्यामध्यें ही विहीर होती व दोघेहि शेजारी अनेक पिढ्या समाईक मालकीनें या विहिरीचा उपयोग करीत आलेले होते.

सांताननें फेंकलेलें हाडूक भिसूवर बसलें असतें तर त्याला स्नान करावयाला लावण्यापलीकडे त्या गोष्टीचा परिणाम गेला नसता ! पण तें विहिरींत पडल्यामुळें त्याच्या या कृत्याला भयंकर अत्याचाराचें स्वरूप प्राप्त झालें !

" सांताननें विहिरींत डुकराचें हाडूक टाकलें ! " केसूनें परत जाऊन आपल्या गोटांत ही बातमी जाहीर करतांच तेथें मोठीच खळबळ उडाली !

" ख्रिस्तांशांनीं विहिरींत हाडकें व पावबिस्कुटें टाकून तुम्हांला बाटावयाचं व तुम्ही शेळपट हिंदूंनीं नुसतं रडत बसायचं हा पूर्वापार चालत आलेला [illegible]च आहे ! "

सोनूनें आवेशानें हातवारे करीत आपल्या अनुयायी वर्गावर तिरस्कारयुक्त नजर फेंकली व त्यांना टोमणा दिला.

किंचित् खजिल होऊन, पण रागानें दांतओंठ चावीत भिसू, बाबलू व इतर कांहींजण उत्तरले, "वाः ! सांतानला आम्ही तसा सोडतों का ! लेकाला घालूं द्या आपल्या घराबाहेर भाटांत जरा पाऊल ! असा ठोकून काढूं !..."

"नाहीं ! तेवढ्यानें भागणार नाहीं !" सोनू म्हणाला, "विहिरींत पडलेलें हाडूक बाहेर निघून एकदोन दिवस लोटेपर्यंत, त्यांतील पाणी आपल्याला घेतां येणार नाहीं ! या उन्हाळ्याच्या दिवसांत आजूबाजूच्या सर्व विहिरी आटलेल्या. दुरून पाणी आणावें लागून आपल्या मंडळींचे तेवढे हाल व्हावयाचे ! व पावलूच्या घरीं मात्र नेहमींहून जास्तीच पाणी वापरायला मिळून त्याची आयतीच सोय व्हायची ! अशानें पाण्याच्या टंचाईच्या दिवसांत मधून मधून विहिरींत हाडकें टाकून आपल्या हिंदु शेजाऱ्यांच्या घरीं होणारा पाण्याचा उपसा थांबवण्याचें हें चांगलेंच साधन या आपमतलबी क्रिस्तांवांच्या हातीं सांपडावयाचं ! तें कांहीं नाहीं. जशास तसं ! मी एक नामी युक्ति सुचवतों. ती कराल तर पावलूच्या घरची मंडळी एका घटकेंत वठणीवर येईल !"

सोनूची युक्ति इतकी बिनतोड, मजेदार व नावीन्ययुक्त होती कीं, ती त्याच्या तोंडून बाहेर पडण्याचाच अवकाश, सबंध बालचमूनें घरामागल्या गोठयाकडे धांव घेतली. सांपडेल तितकें गोठयांतलें शेण त्यांनीं एका टोपलींत गोळा केलें व त्या टोपलीसहित विहिरीकडे आपला मोर्चा वळवला ! लगेच सोनूचा रामबाण तोडगा अमलांत आणला गेला ! सबंध टोपली विहिरींत रिती झाली ! विहिरींत दोनतीन घागरींहून जास्ती पाणी नव्हतेंच. जणुं शेणाचा सडाच आंत तयार झाला !

या सर्व शत्रुपक्षीय हालचालींची आपल्या घराच्या खिडकींतून सांतानकडून टेहळणी चालली होती. भिसूकडून थोबाडींत मिळाल्यामुळें त्याला झालेलें दुःख एवढ्या अवधींत बहुतेक ओसरलें होतें. तेवढीच एक गोष्ट असती, तर नेहमींप्रमाणें थोड्या वेळानें भिसूच्या घरीं येऊन त्यानें त्याच्याशीं समेट केला असता. पण महत्प्रयासानें मिळवलेलें फुलपांखरूं नुकत्याच झालेल्या दंगलींत हातचें सुटून गेलं. मुळें त्याच्या मनाला डंवचत असलेलें दुःख मात्र तो इतक्या लवकर विसरणें शक्य नव्हतें. अर्थात् प्रतिपक्षीयांनीं केलेल्या सर्व घोर कृत्यांची तिखटमीठ

लावून घर्दी देण्याकरितां त्यानें घरांतल्या वडील माणसांकडे धांव घ्यावी, हें साहजिक आहे.

चराचर वस्तूंच्या शुद्धीकरणाचें एक सर्वंम साधन म्हणून शेणाबद्दल हिंदु लोकांच्या मनांत केव्हढीहि पवित्र भावना असली, तरी क्रिस्तांवांना त्या वस्तूंचा किळसच यावयाचा. शेजारच्या मुलानीं केलेल्या इतर गोष्टींचें पावलूच्या घरच्या यायकामंडळीला विशेष कांहीं वाटलें नाहीं. पण अशा पाण्याच्या टंचाईच्या दिवसात विहिरींत शेण टाकून त्यांतील पाणी खराब करण्याचा त्यांचा हा दुष्टपणा मात्र त्यांना खपला नाहीं. सांतुशणे व पावलु हे दोघेहि या वेळीं आपापल्या घरीं नव्हते. ते घरीं आल्यावर पावलूकडून मुलाचा हा व्रात्यपणा सांतुशणेला कळवून त्यांना शिक्षा करवायची, असें त्यांनीं ठरवलें.

सांतुशणे व पावलु यांना कळेपर्यंत हा प्रकार एवढ्यावरच थांबता तर भिसू, बावलू व सांतान यांनीं आपापल्या आजोबांकडून दोनचार चपराका खाण्यांत. सोनूनें निर्माण केलेल्या फुलगांवांतील या धर्मयुद्धाचा त्याच दिवशीं संध्याकाळीं शेवट झाला असता. पण त्यास याहून निराळें स्वरूप यावयाचें होतें !

ही एकंदर गोष्ट त्या ' दुपारच्या वेळीं ' सांतानचा बाप कायतान याच्या कानांवर गेली. कायतानची ' दुपारची वेळ ' हें काय प्रकरण आहे, हें फुलगांवांतल्या प्रत्येक इसमास माहीत होतें. दुपारच्या वेळीं कायतानशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध येऊं द्यावयाचा नाहीं, असा गांवांत सर्वांचा नियमच ठरल्यासारखा होता. चाळीस पंचेचाळीस वर्षें हें कायतानचें वय. एरवीं शांत प्रकृतीचा व सुस्वभावी गृहस्थ. पण दुपारच्या वेळीं आग्यावेताळच त्याच्या अंगांत संचरलेला असावयाचा ! दुपारीं जेवणानंतर यथास्थित काजूची दारू झोंकून तास दोन तास वामकुक्षी घेण्याचें त्याच्या नाजुक प्रकृतीला जरूर असणारें पथ्य गेलीं कित्येक वर्षें त्यानें नियमितपणें पाळलें होतें. अशा या ' दुपारच्या वेळीं ' क्षुल्लक निरुपद्रवी गोष्टीहि त्याचें डोकें भडकवण्यास कारण होत. मग आज घडलेल्या प्रकारासंबंधीं तर विचारावयालाच नको !

सांताननें भिसू व बावलूविरुद्ध नेलेलें गाऱ्हाणें ऐकतांच व त्याच्या गालावर भिसूच्या बोटांचा उठलेला वळ पाहातांच कायतानचें पित्त खवळलें !

सोनूच्या व्याख्यानाचे फवारे उडूं लागले, कीं त्यांतील कांहीं तुषार काय-तानच्या कानांपर्यंतहि जात असत. त्यामुळें सोनूविषयीं त्याचें मन पूर्वीच कलु-

षित झालें होतें. आजच्या या एकंदर प्रकारामध्यें त्याचेंच अंग असावें, हें कायतानने ताडलें. आधींच लाली आलेले त्याचे डोळे व तोंड संतापानें जास्तीच लालबुंद झालें. ताडकन् खाटेवरून उठून तो सांतुशणेच्या घराकडे निघाला !

" असं का ? येथवर पाळी आली ! आज आठ दिवस एकसारखी वटवट चालवून सेर्मावं झोडतो आहे, तीं ह्यींच का ? लेकाचं आज टाळकंच सडकतों ! म्हणावं इथं नाहीं चालायाचा तो शहरांतला शहाणपणा ! " असें रागानें स्वतः-शींच पुटपुटत जातांना बागेंतल्या पेरूच्या झाडाच्या फांदीची एक काठी मोडून त्यानें हातीं घेतली.

थेट सांतुशणेच्या चौकीवर जाऊन तो उभा राहिला व आपले डोळे गरगरां फिरवीत, दांतओंठ चावीत दरडावून सोनूला म्हणाला, " काय रे, ए कार्ट्या ? ही काय पुंडाई आरंभिली आहेस तूं ? या कायतानशीं चालायचे नाहींत बरं हे चाळे ! चांगले कान उपटून हातीं देईन ! काय कारण होतं रे तुला विहिरींत शेण टाकण्याबद्दल मुलांना फूस द्यायचाला ? "

" शेजाऱ्या, असं पाहा," सोनूनें अगदीं धिमेपणाचा व पोक्तपणाचा आव आणून उत्तर दिलें, " तुझ्या गुणी बाळानें विहिरींत हाड टाकलं त्यामुळें पाणी विटाळलं ! विटाळलेली कोणतीहि वस्तु शुद्ध करून घेण्यासाठीं आमच्या धर्मांत सांगितल्याप्रमाणें शेणाचा आम्ही हिंदु लोक उपयोग करतों, हें तुला माहीत आहेच. विहिरींत शेण टाकण्याचं कारण हें असं उघड आहे ! "

आपल्या या बिनतोड उत्तरानें कायतान निरुत्तर होईल, अशी सोनूची अपेक्षा होती; पण ती खोटी ठरली. कायतान जास्तीच चवताळून ओरडला, " तूं एवढंसं शेंबडं पोर ! आणि मला या असल्या फिलोसोफी सांगणार ? तूंच आज आलास मोठा हिंदूंचा बाप विहिरींत शेण टाकून त्या शुद्ध करून घ्यायला ! मी बोळ्यानं दूध का पितों आहें, तुझं हें थोतांड ऐकून घ्यायला गाढवा ? "

" अहो महाराज, कुमारी मारीयच्या पोटीं क्रिस्त जन्माला आला, या गोष्टी-वर मात्र तुम्ही विश्वास ठेवतां, व आमच्या धर्मांतील या गोष्टी मात्र झूट मानतां ? बरं आतां मेहेरबानी करून घरीं जा व नीट शुद्धीवर आल्यावर पुनः या, म्हणजे तुम्हांला आमचं सारं धर्मशास्त्र नीट समजावून देईन ! जा ! "

आपल्या वर्मी घाव घालण्याच्या उद्देशानें सोनूनें उच्चारलेले हे शब्द संपले न संपले, तोंच कायतानच्या हातांतील काठीचे जोराचे तडाखे त्याच्या पाठीवर

बसण्यास सुरवात झाली ! सोनूनें आपल्या तोंडाचा पट्टा चालवून आत्मसंरक्षण करण्याचा प्रयत्न केला; पण त्याचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. पांचसहा मिनिटें कायतानानें आपल्या हाताचा सपाटा सारखा चालू ठेवला व नंतर त्यानें आंबल्द्या घराचा रस्ता सुधारला !

● ● ●

जगांत कोठेंहि कारण आधीं नंतर कार्य ! कार्याचें वास्तविक स्वरूप जाणून घेणें असेल, तर त्याच्या कारणाकडे आधीं दृष्टि वळवणें अवश्य असतें. पण कधीं कधीं प्रथमदर्शनींच कार्य मनुष्याच्या मनाचा असा कबजा घेतें कीं, कारणाचा निर्विकारपणें विचार करण्यास अवश्य असलेला समतोलपणा तेथें शिल्लकच राहात नाहीं ! पुष्कळांच्या हातून त्यांच्या आयुष्यात घडणारे प्रमाद येथून उद्भवतात !

सातुशणे व पावलु द-हा यांच्याहि बाबतींत त्या दिवशीं असेंच झालें ! सांतुशणे संध्याकाळीं घरांत पाऊल टाकतात न टाकतात तोंच कायतानानें दारूच्या धुंदींत ' कांहीं विशेष कारण नसतां ' सोनूला कसा बेदम मार दिला ही गोष्ट घरांतल्या सर्व मंडळींनीं त्यास तिखटमीठ लावून व फुगवून कथन केली. एकुलता एक नातु ! बऱ्याच वर्षांनीं आजोळीं आलेला ! त्याजवर आलेला हा प्रसंग ऐकतांच सातुशणेचें मन पराकाष्ठेचें कळवळलें व संतापलें ! अशा स्थितींत, घडलेल्या गोष्टींची कारणें जाणून घेण्याचा त्यांनीं केलेला प्रयत्न अपुरा व पूर्वग्रहदूषित असावा, यांत मोठेंसें आश्चर्य नाहीं. शिवाय तीं त्यांना यथाभूत व सविस्तर सांगण्याइतका विचारीपणा, एवढा उद्वेगजनक प्रकार झाल्यानंतर घरांतल्या इतर मंडळींमध्यें तरी कसा असेल ?

" गेल्या चार पिढ्या आम्हां दोघांहि शेजाऱ्यांमध्यें केवढा दाट घरोबा ! पण पावलूच्या मागें हा दारुडा कायतान तो असाच कायम राखील, असें दिसत नाहीं ! आज हा कधीं न घडलेला प्रकार घडला ! वेळींच सावध होऊन त्यांच्याशीं असलेली घसट एव्हांच कमी केलेली बरी ! म्हणजे असे हे प्रसंग पुन्हां होणें तरी टळेल ! " सांतुशणे वैतागलेल्या व क्षुब्ध स्वरांत म्हणाले.

नेमक्या याच वेळीं पावलु सांतुशणेच्या घरीं आला. दुपारच्या भांडणाची हकीकत त्यास नुकतीच कळलेली ! " सांतुशणेच्या नातवानें गांवांतल्या सर्व कोंकण्या पोरांकरवीं संतानास मार देवविला ! विहिरींत शेणाचा ढीग ओतला ! कायतानला ' दारुडा ' म्हणून शिव्या दिल्या ! क्रिस्ताची निंदा केली ! " या

एवढ्या भागाचाच एकतर्फी विस्तार त्याच्या कानावर आलेला! अर्थात् त्याचाहि चित्तक्षोभ व्हायला उशीर लागला नाहीं. सांतुशणैस आपल्या नातवाच्या वर्तनाला आळा घालण्याची सूचना देण्यासाठीं तो तत्काळ घरून निघाला. दोघेहि एकाच मन:स्थितींत! त्यामुळें त्यांचें संभाषण व्हाव्या तितक्या शांतवृत्तीनें होईना! शब्दास शब्द! उत्तरास प्रत्युत्तर! एका गैरसमजामुळें दुसरा गैरसमज! हे सर्व प्रकार होऊन अखेरीस दोघेहि वर्दळीवर आले व एवढें कडाक्याचें भांडण झालें कीं, "तुझ्या घरात जन्मात कधीं पुन्हा पाऊल टाकणार नाहीं!" असे शेवटीं आपल्या शेजाऱ्यास बजावून पावलु आपल्या घरीं निघून गेला!

आज अनेक वर्षें या दोघा शेजाऱ्यामध्यें किती निकट संघटण चालत आलेलें! केव्हांहि शेतीवाडीचीं व घरसंसाराचीं कांहीं बिकट कामें उद्भवल्यास पावलूनें सांतुशणैची सल्लामसलत व मदत घ्यावी. त्याचप्रमाणें पणजीच्या सरकारदरबारीं किंवा कोर्टकचेरीशीं कांहीं संबंध आला, कीं स्वतःला न झेपणाऱ्या त्या भानगडी सांतुशणैनें खुशाल पावलूवर सोंपवाव्या. कुटुंबातील मंडळी मागें ठेवून पुरुषाना कांहीं दिवस घरापासून दूर गावीं जावें लागणें म्हणजे त्यास केवढी काळजी वाहण्यासारखी गोष्ट! पण असा प्रसंग एखादे वेळीं आल्यास सांतुशणै व पावलु यांस परस्परांचा एवढा भरंवसा कीं, "मुलाबाळावर नजर असूं द्या बरं!" एवढी सूचना एकानें दुसऱ्यास दिली, कीं तो झाला मोकळा निश्चिंतपणें घरून निघण्यास! सांतुशणैच्या घरची बायकामंडळी व मुलीबाळी, विणकाम, भरतकाम किंवा कशिदा शिकण्याकरतां अथवा अंगडींटोपडीं बेतणें, शिवणें, फुलांच्या वेण्या गुंफणें अशा प्रकारच्या आपल्या कामाकरतां पावलूच्या घरीं गल्या नाहींत; तसेंच पावलूच्या घरच्या माणसांनीं लोणचीं, मुरंबे, पापडशेवया करून घेण्याकरतां, आजीबाईच्या औषधी करंड्यांतून लहान मुलाचे काढे, मुळ्या नेण्याकरता व अशाच इतर गोष्टींसाठीं आपल्या या हिंदु शेजारणींकडे खेप घातली नाहीं असा दिवस तर क्वचितूच जाई. संध्याकाळीं गळ घेऊन नदीवर जावें, रात्रीच्या कढीसाठीं पुरेशी मासळी पकडावी हा कायतानचा दररोजचा प्रघात. पण मासळी घेऊन नदीवरून परत आल्यावर आपल्या शेजाऱ्याच्या घरावरून जातांना बाबलू व भिसू यांना हांक मारावी व दोनचार खरचण्या किंवा भुङ्गोद्या त्यांच्या हातावर ठेवाव्या हा त्याचा नियमहि कधीं चुकत नसे,

एक दोन दिवसांआड पावलूच्या बागेंतील चांफ्याशेवंत्यांनीं भरलेली एखादी दुसरी परडी व पेरू, सीताफळें, पोपया हीं फळें सांतुशणेच्या घरीं यायचींच. उलट सांतुशणेच्या घरीं सणासुदीच्या दिवशीं व इतर विशेष प्रसंगीं होणारें गोड-धोड व पक्वान्नें यांत या क्रिस्तांव शेजाऱ्यांना हिस्सा हमखास ठेवलेला. दोन्ही घरांतील मुलांचें मेतकूट तर विचारूंच नका! एकमेकांच्या घरीं खेळतांना, आजू-बाजूच्या झाडांवरील पक्ष्यांचीं घरटीं हुडकतांना किंवा शेजारच्या टेंकडीवरील काजू-करवंदांच्या फडशा उडवतांना मिग्रू, बाबलू व सांतान हें त्रिकूट नेहमीं एकत्र दिसायचें!

पण इतका दीर्घकाळ अशा गुण्यागोविंदानें व खेळीमेळीनें वागत आलेल्या या दोन्ही कुटुंबांतील माणसांच्या परस्पर संबंधांत यापुढें केवढें रूपांतर घडून आलें! आजवर त्यांजमध्यें चालत आलेलें बोलणें-चालणें, ये-जा, देव-घेव, हे सर्व प्रकार अजिबात बंद झाले. मिग्रू, बाबलू व सांतान यांनीं अजून पर-स्परांशीं थोडासा संबंध ठेवला होता; पण तो आपापल्या घरांच्या हद्दींत राहून एकमेकांना वाकोल्या व जिभा दाखविणें व शिव्या देणें एवढ्यापुरताच! यंदाच्या गणेशचतुर्थीच्या दिवशीं व इतर एक दोन सणांच्या दिवशीं सांतुशणेच्या घरीं सालाबादप्रमाणें पावलूच्या घरून फुलांची भेट आली नाहीं. त्याचप्रमाणें पावलूच्या घरच्या कोलाचें फस्त साजरें झालें, त्या दिवशीं सासेबाहितआबाच्या मूर्तीपुढें लावण्यासाठीं सांतुशणेकडून जाणारें मेणबत्त्यांचें वर्षासन यंदा रद्द झालें. इतकेंच नव्हे तर लहानमहान कारणावरून या दोघांहि शेजाऱ्यांमध्यें पुनःपुन्हा खटके उडूं लागले! पावलूच्या घरचीं डुकरें व कोंबड्या पूर्वीं क्वचितच आपल्या हद्दीपलीकडे जात. पण सांतुशणेच्या परसांत शिरून तेथील भाजीकुंडी, कपडे, इ० वस्तु विटाळण्याचा जणुं त्यांना आता नादच लागला. त्याचा वचपा काढण्यासाठीं सांतुशणेचीं गुरेंहि पावलूच्या बागेंत शिरून तेथील केळींचा व इतर फळझाडांफुलझाडांचा फडशा उडवूं लागलीं! सांतुशणेच्या घरच्या उष्ट्या पत्रावळींचा व केरकचऱ्याचा पावलूच्या घराच्या कुंपणालगत ढीग जमूं लागला. पावलूच्या घरचीं जेवणानंतरचीं हाडकें, अर्थात् मांसाचे तुकडे, अंड्यांच्या कवच्या सांतुशणेच्या बळकांवांसमोर पडलेल्या दिसूं लागल्या, यांत नवल नाहीं. शेवटीं अशीच एक गोष्ट विशेष निकराला जाऊन तिचें पर्यवसान सांतुशणेनें पावलूवर फिर्याद करण्यांत झालें!

सांतुबाबा व पावलु हे दोघेहि आपापल्या समाजांतील प्रमुख पुढारी. त्यामुळें या प्रकरणांत दोन्ही समाजांतील इतर बऱ्याच गांवकऱ्यांनीं आपापल्या पुढाऱ्यांची बाजू घेतली व अशा रीतीनें या एकंदर प्रकाराचा शेवट असा झाला कीं गांवांत पूर्वी कधींहि नसलेले हिंदु व क्रिस्तांव असे दोन नवीन तट निर्माण झाले!

या एवढ्या अवधींत आजोळ सोडून सोनूहि आपल्या घरीं निघून गेला होता. गोव्यांतील एका साप्ताहिकांतून त्यानें लिहावयाला सुरू केलेल्या ' परशुरामभूमींतील पुण्यपर्वणी ! ! ! ' या दणदणीत लेखमालेतील पहिलें महा स्तंभ याच वेळीं प्रसिद्ध झाले ! अखिल भरतखंडाला विदित होण्यासाठीं त्याने त्यातून आर्यसंस्कृत्युद्धारार्थ फुलगांवांतील हिंदु वीरश्री जागृत झाल्याची नेमाचकारी मंगलवार्ता घोषित केली होती !

● ● ●

गोव्यांत त्या वर्षी ठिकठिकाणीं आलेला महापुराचा प्रसंग लोक अजून विसरलेले नाहींत! त्यासंबंधींची आठवण निघाली कीं, कोसळून पडलेलीं घरें, वाहून गेलेलीं गुरेंढोरें, भाटांचें व बागबागाइतींचें झालेलें नुकसान, नाश पावलेली मालमत्ता, अपघातांत सांपडलेल्या माणसांची प्राणहानि, अशा अनेक आपत्तींचीं वर्णनें गांवोगांव ऐकायला मिळतील. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, फुलगांवामध्यें मात्र कोणाहि इसमाकडे तुम्ही या महापुराची गोष्ट काढाल तर उल्हसित मनानें तो तुम्हांला निराळेंच वृत्त आधीं कथन करील ! तें कोणतें ?

इतर अनेक गांवाप्रमाणेंच फुलगांवांतील लोकांचीहि महापुरामुळें वाताहात झाली नाहीं असें नाहीं, पण त्या प्रसंगीं प्राप्त झालेल्या एका अकल्पित दुर्घटनेनें त्या गांवाची कधींहि भरून निघूं न शकणारी अशी एवढी मोठी एक हानी टळली कीं, हा महापूर म्हणजे तेथील लोकांना त्यांच्या पुरती तरी एक इष्टापत्तीच वाटली !

दर दोनचार वर्षांनीं अधूनमधून नदीचें पाणी चढून गांवाच्या थोड्याशा भागावर बुडती येणें, ही गोष्ट फुलगांवासारख्या नदीकांठच्या गांवांतील लोकांना नवीन नव्हती. म्हणूनच त्या वर्षी मृग नक्षत्राच्या सुरवातीस जेव्हां दोनचार दिवस पावसानें एकसारखा झोड उठवला तेव्हां लोकांस त्याची मुळींच फिकीर वाटली नाहीं. पण पांचवे दिवशीं रात्रीं महापुराचें रौद्र स्वरूप अचानक व्यक्त होतांच सर्वांचें धाबें दणाणलें !

निश्चिंत मनानें झोपी गेलेला सबंध गांव मध्यरात्रीच्या सुमारास खडबडून जागा झाला. ओघामध्यें वाहून जाणारीं गुरें, डुकरें, कोंबडीं, इत्यादि प्राण्यांचा दीनवाणा स्वर कानीं पडूं लागला! मधून मधून एकादें दुसरें घर कोसळून पडूं लागलें! नदीच्या पाण्याची खळबळ व त्यांत वाहून येणाऱ्या अनेक लहान-मोठ्या वस्तूंचा भीषण नाद दर घटकेला वाढूं लागला! लोकांची धांवपळ व धडपड सुरू झाली! मौल्यवान् मालमत्ता बचावण्यासाठीं कित्येकांनीं जिवापाड प्रयत्न चालवले! आपल्या प्राणरक्षणासाठीं स्वतःचीं घरें सोडून दुसऱ्यांच्या घरांचा व झाडांचाहि आश्रय घेण्याची बऱ्याच जणांवर पाळी आली!

या अशा घोर संकटांत सांतुशणे व पावलु-द-सा यांचा मात्र इतर सर्व गांव-कऱ्यांना हेवा वाटूं लागला! त्या दोघांचींहि घरें गांवाच्या एका टोंकाला असलेल्या उंचवट्यावर असल्यामुळें महापुरापासून त्यांस भीति बाळगण्याचें कारण नाहीं अशीच सर्वांची कल्पना होती. चाळीस वर्षांमागें आलेल्या एका महापुराच्या वेळीं या गोष्टीचा प्रत्यय आला होता.

सांतुशणे व पावलु यांनाहि आपापलीं घरें महापुरापासून सुरक्षित राहूं शकतील अशी पुरी खात्री वाटत होती. पण तो त्यांचा समज लवकरच चुकीचा ठरला! चाळीस वर्षांमागें आलेल्या महापुराहूनहि या महापुराची चढती कळा होती. पहांटेच्या सुमारास या दोन्ही घरामध्यें पाणी चढूं लागलें! पावलूच्या मुख्य घरापासून कांहीं अंतरावर व सखल भागावर असलेलें त्याचें परसांतलें पडघर तर यापूर्वीच वाहून गेलें होते व पहांट होईपर्यंत या गोष्टीची घरांतील मंडळीला दादहि नव्हती! पाणी व त्याबरोबरच या दोन्ही घरातल्या माणसांची काळजीहि सारखी वाढूं लागली! कांहीं तासांनीं दोन्ही घरांचा खालचा मजला पाण्यांत बुडून गेला व वरच्या मजल्याचा त्यांना आश्रय घ्यावा लागला. सांतुशणेनें श्रीमंगेशास महारुद्राचा नवस केला! पावलूनेंहि सांफ्रांसिस्काच्या कॉव्हेंतास एक मिस् देऊं केलें!

सुदैवानें कांहीं वेळानें पाणी चढण्याचें बंद झालें. पण तें ओसरून जाण्याची मात्र चिन्हें दिसेनात! पूर लवकर न ओसरल्यास सांतुशणेच्या घरच्या माणसांस विशेष फिकीर बाळगण्याचें कारण नव्हतें. भूक निवारण करण्यास जरूर असलेली सर्व सामुग्री त्यांजपाशीं होती. पावलूच्या मंडळींवर मात्र आणखी थोड्या तासांनीं पूर ओसरून न गेल्यास विकट प्रसंग गुदरणार होता. परसांतल्या पड-

घरांत त्यांचें स्वयंपाकघर व दाणागोटा व जेवण्याखाण्याचे इतर जिन्नस यांची कोठी हीं दोन्ही असत. पण सबंध पडघरच वाहून गेल्यामुळें अन्नाचा एखादा कणहि त्यांना आतां दिसणें मुष्किल होतें ! या प्रसंगीं सांतुशणेच्या घरून तेवढा अन्नाचा त्यांस पुरवठा होऊं शकला असता. पण पावलूची अभिमानी वृत्ति, आपल्या शेजाऱ्याकडे मदत मागण्याचा लाचारपणा अशा प्रसंगींहि त्यास स्वीकारूं देईल किंवा सांतुशणे आपल्या शेजाऱ्यावर आलेला घोर प्रसंग ओळखून आपण होऊन त्यास मदत करण्याचें मनौदार्य दाखवील, या दोन्ही गोष्टी संभवनीय नव्हत्या. कारण त्यांच्या कोर्टांतील दाव्यास दोनच दिवसापूर्वी इतका रंग चढला होता कीं साक्षीदारांच्य जबान्यानंतर लवाद नेमण्यात येऊन पाहणीसाठीं दिवसहि ठरला होता !

बरें, पुराचें पाणी ओसरून जाईपर्यंत गांवांतल्या इतर लोकांकडून अन्नसामुग्री मिळवण्याचा प्रयत्न करावा तर तीहि गोष्ट अशक्य कोटींतली ! कारण पुळगांवावरून वाहाणाऱ्या नदीला मध्येंच एक वळण असून या वळणाच्या अलीकडे सांतुशणे व पावलु-द-सा यांचीं घरें व इतर सर्व गावक-यांचीं घरें या वळणाच्या पलीकडे, अशी या गावाची रचना होती. हें वळण इतकं वाकलेलें होतें कीं, नदीचें पाणी व त्याबरोबर त्याचा जोर थोडासा वाढला कीं, तेथें हटकून भोंवरा निर्माण व्हावयाचा ! मग आता तर महापूरच होता ! मागील महापुराच्या प्रसंगीं या भोंवऱ्यात सापडून प्राणाला मुकलेल्या माणसामुळें लोकांच्या मनाला बसलेला दचका इतका कायम होता कीं, अशा या भयंकर ठिकाणीं एखाद्या देवचाराची वसती असलीच पाहिजे अशी ठाम समजूत करून घेऊन त्यास दरवर्षी गांवांतले खारवी न चुकतां कोंबडा बळी देत आले होते. अशा परिस्थितींत पावलु किंवा त्याचा मुलगा कायतान यांनीं पलीकडे जाण्यासाठीं किंवा त्यांच्या मदतीसाठीं गावांतल्या लोकांनीं अलीकडे येण्यासाठीं पोहून किंवा होडींतून तो भोंवरा ओलांडण्याचा हिय्या करणें, ही दुर्घट गोष्ट होती !

पूर ओसरून जाऊन गावांतल्या इतर लोकांशीं लवकर दळणवळण सुरू होईल व आपल्यावर आलेला प्रसंग टळेल, या एवढ्याच आशेवर पावलूच्या घरच्या मंडळीला अवलंबून राहणें आतां भाग होतें !

पण तो सबंध दिवस गेला व दुसरा दिवस उजाडला तरी पाणी ओसरेना ! उलट मधूनमधून पावसाच्या मुसळधारा सुरू होत व ओघ थोडासा वाढल्या-

चाच भास होई ! दोन दिवसांच्या उपोषणानें पावलूच्या कुटुंबांतील मोठया माणसांचेसुद्धां प्राण व्याकूळ झाले होते. मग सातान व त्याचीं लहान भावंडें यांचे काय हाल झाले असतील याची कल्पनाच केलेली बरी ! कावून जाऊन खाऊबद्दल तीं अजाण अर्भकें पुनःपुन्हां एवढ्या मोठयानें रडणें, ओरडणें चाल-वीत कीं, ते पलीकडच्या सांतुशणेच्या घरींहि ऐकूं जात असे !

दुसरा दिवस गेला व रात्र आली ! मुलांचें भुकेनें विव्हळणें एकसारखें चालू होतें ! व तें पाहून वडील माणसांचीं हृदयें दुःखानें पिळवटून निघत !

बिचारी कायतानची आई बाहेरील पाण्याकडे निश्चल दृष्टीनें पाहत खिड-कीशीं बसली होती. तिचे डोळे आंसवांनीं भरून आले होते! 'आमच्या बापा' व 'नमन मोरिये' या स्तोत्राचा तिनें एकसारखा पाठ चालवला होता! भक्ति-पूर्वक मधूनमधून ती स्वतःवर खुरिसाच्या खुणाहि ओढीत होती !

तोंच अचानक एक लहानसा आशेचा किरण तिला दिसून आला ! लगेच कायतानला हांक मारून आशाळभूतपणानें ती म्हणाली, "तें पाहिलंस का ? सांतुशणेच्या घरामागील फणसाच्या झाडाला अडकून राहिलेलं पांढऱ्या रंगाचं तें कांहींतरी दिसतं आहे ! बहुतेक तो आपल्या स्वयंपाकघरातील वेताचा पेटारा असावा. तसं असेल तर ईश्वरच आपल्या हांकेला पोहोचला असें म्हणायला पाहिजे ! कारण परवां रात्रीं दुसऱ्या दिवशीं डुकरांना चारण्यासाठीं कांहीं शिळे पाव त्या पेटाऱ्यांत मी ठेवून दिले होते. पाण्यानें भिजलेले व शिळे का असेनात, पण ते पाव हातीं येतील तर, आम्हां सर्वांची उपासमार दूर होईल !!"

तिच्या तोंडून हे शब्द निघण्याचाच अवकाश, कायताननें तात्काळ पाण्यांत उडी घेतली व त्या झाडाकडे पोहायला सुरवात केली. तो आतां काय घेऊन परत येतो, याच्याकडे सर्वांचे डोळे लागून राहिले !

पण एकदोन मिनिटांत निराशाच त्यांच्या वांट्याला आली ! घाईघाईनें पाणी तोडीत रिकाम्या हातानें कायतान परत आला ! दम खाण्यापुरतासुद्धां विसावा न घेतां, धापा टाकतां टाकतांच तो बोलला, "मी त्या पेटाऱ्यापर्यंत गेलोंच नाहीं !"

"तें कां ?" त्याच्या आईनें अधीरतेनें प्रश्न केला.

"हें काय पापा ? आम्हांला किती भूक लागली आहे ! तो पेटारा घेऊन या ना लवकर !" सांतानहि रडकुंडीस येऊन म्हणाला.

" आपल्याहून कितीतरी मोठें संकट सांतुशणेच्या मंडळींवर आलें आहे! त्या पेटाऱ्याकडे जातांना त्यांच्या घराच्या मागील भिंतीचे बाहेरचे भाग कोसळून पाण्यांत पडल्याचा आवाज दोनतीनदां माझ्या कानीं आला. काळोखामुळें नीट दिसेना म्हणून किंचित् जवळ गेलों, तों काय सांगणार! सबंध भिंत पाण्यानें फुगून गेलेली व तिला मध्येंच भलीमोठी भेग पडलेली! कोण जाणे, ती सबंध भिंत व छप्पर खालीं यायला एकदोन मिनिटेंहि पुरें होतील, व त्या बिचाऱ्यांना या गोष्टीची गंधवार्ताहि नसेल! त्या सर्वांचे प्राणच धोक्यांत असल्यामुळें मी त्या पेटाऱ्याकडे जाण्यांत वेळ न गमावतां तसाच परत आलों. मला वाटतें त्यांजवर येऊं घातलेल्या या संकटाची त्यांस आपण तावडतोब सूचना द्यावी व त्या सर्वांस आपल्या घरीं येऊन राहण्यास सांगावें!"

" अलबत्! या अशा प्रसंगीं आपलं त्यांच्याशीं असलेलं वैर आपण साफ विसरून गेलं पाहिजे!" अनुकंपायुक्त स्वरानें त्याची आई म्हणाली.

पावलूनेंहि आपल्या बायकोच्या म्हणण्यास दुजोरा दिला.

लगेच कायतान व पावलु यांनीं घाईघाईनें कांहीं लांकडें व फळया एकत्र बांधून एकप्रकारचा तराफा तयार केला व तो घेऊन कायतान शांतुशणेच्या घराकडे वळला.

याच वेळीं सांतुशणेच्या घरीं त्याची बायको आपल्या नातवंडांस खाऊं घालीत असतां आपल्या नवऱ्यास उद्देशून म्हणाली, " ऐकलं का? त्या पावलूच्या बिचाऱ्या नातवंडांची भुकेनें काय अवस्था झाली असेल ईश्वर जाणे! वैऱ्यावरहि येऊं नये असा हा प्रसंग! या वेळीं का त्यांच्या आमच्यामध्यें उत्पन्न झालेला वांकडेपणा मनात बाळगायाचा? अशा प्रसंगींसुद्धां आपण शेजारधर्म पाळला नाहीं तर तें देवाला बरं दिसेल का?"

" माझी तरी त्यांना मदत करायला कुठं ना आहे? कालपासूनच मला वाटतं आहे कीं, एखाद्या टोपलींत त्या सर्वांना पुरतील एवढे खाण्याचे पदार्थ घालून ते त्यांच्याकडे पोहोंचवावे. पण त्या पावलूला ताठा भयंकर! गृहस्थ अशा वेळींसुद्धां आपल्याला झिडकारून आपली मदत नाकारायचा!" किंचित् अपराधी स्वरानें सांतुशणेच्या तोंडून हे शब्द निघाले.

" तें कसंहि असो! आतां ही एवढी टोपली त्यांजकडे पोहोंचवावीच!"

असें म्हणून भातभाजीनें भरलेलीं दोन भांडीं एका टोपलींत ठेवून ती त्याच्या बायकोनें सांतुशणेपुढें केली.

सांतुशणेनें लगेच धोतराचा कांचा खोंवला व एका हातांत टोपली पकडून पाण्यांत उडी टाकली.

एक दोन मिनिटांत कायतान व सांतुशणे यांची पाण्यांत दोघांच्याहि घरां-मध्यें गांठ पडली. एकमेकांकडे दृष्टि जाताच दोघांनाहि मोठाच अचंबा वाटला!

" कुठं चालला ? " कायताननें प्रश्न केला.

" तुमच्याकडे ! मुलांसाठीं थोडा भात व भाजी आणली आहे ! अशा वेळींहि तुम्ही आमच्यासंबंधीं इतका परकेपणा बाळगावा व आम्हांकडून खाण्याचे पदार्थ मागून न नेता हे दोन दिवस हालांत काढावे, हें आश्चर्य आहे बुवा!"

" बरं, तें असूं द्या ! " किंचित् ओशाळलेल्या पण कृतज्ञतेच्या स्वरांत कायतान म्हणाला, " प्रथम तुमची सर्व माणसें या तराफ्यावरून एकामागून एक आमच्या घरीं आणूं ! यत्किंचितहि दिरंगाई उपयोगी नाहीं. तुमच्या घराची भिंत कोसळून पडण्याच्या बेतात आहे, याची तुम्हांला मुळींच जाणीव नसेल ! "

सांतुशणेनें वेगानें पाण्यावर आठदहा हात टाकले व स्वतः जाऊन भिंत पाहिली. कायताननें सांगितलेल्या गोष्टीची खात्री पटताच त्याच्या उरात धडकी भरली! तत्क्षणीं विष्णुसहस्रनामाचा पाठ त्याच्या तोंडून सुरू झाला व कांसवा-च्या वेगानें त्यानीं आपलें घर गाठलें!

एकदोन मिनिटांत कायतानच्या साहाय्यानें आपल्या घरचीं सर्व मंडळी तराफ्यावरून सुरक्षितपणें त्यांनीं पावलूच्या घरीं नेऊन पोंचवली तेव्हांच त्यांच्या जिवांत जीव आला!

शेवटच्या खेपेस सांतुशणेच्या घरची सर्व अन्नसामुग्रीहि तराफ्यावरून पावलूच्या घरीं आली, हें सांगावयास नकोच!

यानंतर पांचदहा मिनिटें गेलीं न गेलीं तोंच सांतुशणेच्या घराच्या पिछा-डीला मोठा आवाज झाला! सबंध भिंत पाण्यांत कोसळली होती!

एक दोन मिनिटांत पुनः तसाच आवाज ऐकूं आला! घराचें छप्पर खालीं आलें होतें!

पावलूच्या घरचीं मुलें या वेळीं अधाशीपणानें भातभाजीचे घांस खात होतीं!

पावलूला व त्याच्या कुटुंबांतील इतर माणसांनाहि अन्न वांटण्यांत सांतुशणेची बायको गुंतली होती !

नुकत्याच पाण्यांत कोसळलेल्या आपल्या घराच्या छपराकडे पहात असलेल्या व कृतज्ञतेनें डोळे भरून आलेल्या सांतुशणेच्या तोंडून उद्गार निघाले, "इतर सर्व गोष्टींहून शेवटीं शेजारधर्मच श्रेष्ठ ठरतो, नाहीं पावलू ?"

"होय, इर्मांव ! 'Ama a teu pro'ximo como a ti mesmo!' ('स्वतः इतकेंच आपल्या शेजाऱ्यावर प्रेम कर !') ही मुळीं आमच्या जेजुची आज्ञाच आहे !" पावलुहि गहिंवरून बोलला !

गेल्या दोनतीन महिन्यांत या दोघां शेजाऱ्यांच्या मनावर परस्परांविषयीं आकस्मिकपणें चढलेलें वैरभावाचें पुट अशा रीतीनें या महापुरानें धुवून निघालें ! त्याबरोबरच फुलगांवांत हिंदु व क्रिस्तांव या दोन्ही समाजामध्यें भडकत चाललेला कलहाचा वणवा विझावलाहि हाच महापूर कारण झाला !

फुलगांवांत घडून आलेल्या स्थित्यंतराची वार्ता सोनूच्या कानीं जातांच वर्तमानपत्रांतून चालू असलेल्या त्याच्या लेखमालेचा ओघ मात्र राजापुरी गंगेप्रमाणें एकाएकीं गुप्त झाला !



## अभ्यास

१. तीन छोट्या नाट्य-प्रवेशांच्या रूपानें या कथेची मांडणी करा. अशी मांडणी करतांना तुम्ही मुख्य पात्रें कोणतीं मानाल? तीं कां तें सांगा.

२. 'स्वतःइतकेंच आपल्या शेजाऱ्यावर प्रेम कर' या येशू ख्रिस्ता-च्या एका आज्ञेचें पालन या गोष्टींतला पावलु करतो. ख्रिस्ताच्या दहा आज्ञांची माहिती मिळवून त्याच्या उपदेशाचें सार थोडक्यांत सांगा.

३. या गोष्टींतल्या सोनुमारखीं मुलें आजकालहि आढळतात. अशा प्रकारच्या एखाद्या मुलाचें विनोदी वर्णन करा.



# श्रीमती ४

## परिचय

रवींद्रनाथांच्या कवितांप्रमाणें त्यांच्या लघुकथाहि कल्पकतापूर्ण व सरस असतात. त्यांनीं जशा आधुनिक पद्धतीच्या अनेक सुंदर लघुकथा लिहिल्या आहेत, तशा अतिशय लहान पण तितक्याच अर्थपूर्ण गोष्टी लिहिण्याच्या प्राचीन काळांतल्या पद्धतीचाहि त्यांनीं मोठ्या हौसेनें अवलंब केला आहे. त्यांच्या कल्पकतेमुळें आणि कथेंतून सूचित होणाऱ्या जीवनविषयक तत्त्वज्ञानामुळें त्यांच्या असल्या छोट्या गोष्टी फार आकर्षक वाटतात. 'श्रीमती'-ही अशीच एक कथा आहे. कधी काळीं ऐकलेल्या किंवा वाचलेल्या एखाद्या लोककथेवर लेखकानें तिची उभारणी केली आहे कीं काय हें सांगता येणार नाहीं. पण या छोट्या गोष्टींतून सूचित होणारें सत्य इतक्या हृदयस्पर्शी रीतीनें सांगितलें गेलें आहे कीं आपण एखादी ऐतिहासिक सत्यकथाच ऐकत आहों असा मनाला भास होतो.

या गोष्टींतली श्रीमती ही राजवाड्यातली एक गरीब दासी आहे. राजाच्या लहरीप्रमाणें नाचणाऱ्या इतर बड्या माणसांनीं आपली बुद्धि गुंडाळून ठेवून, आपल्या श्रद्धेची गळचेपी करून बुद्धाच्या मंदिरावर बहिष्कार पुकारला असला तरी ही दासी आपली उत्कट भक्तिभावना प्रगट करायला क्षणभरहि कचरत नाहीं. राजाच्या आज्ञेविरुद्ध बुद्धमंदिरांत जाऊन पूजा करणें म्हणजे मृत्यूला आमंत्रण देण्यासारखें आहे हें तिला माहीत नसतें असें नाहीं. पण श्रद्धेचा मृत्यु हा शरीराच्या नाशापेक्षां तिला अधिक भयप्रद वाटतो. आयुष्य म्हणजे आपल्या निष्ठेकरितां जगणें, इतकेंच नव्हे तर प्रसंगीं तिच्याकरितां हांसत मरणाला मिठी मारणें होय हें श्रीमतीचें जीवनसूत्र आहे.

*कुठलीहि ज्योति—ती भक्तीची असो वा क्रांतीची असो—अखंड तेवत ठेवण्याचा जगांत जो प्रयत्न होतो तो श्रीमतीसारख्या सामान्य गणल्या जाणाऱ्या प्रामाणिक माणसांकडूनच ! बुद्धिमंत किंवा धनवंत बहुधा असल्या फंदांत पडत नाहींत. अहंकारामुळें, स्वार्थामुळें, भोगामुळें आणि लोभामुळें ते अप्रामाणिक होतात. त्यांना प्राणांची भीति वाटते, दारिद्र्याची भीति वाटते, कष्टांची आणि क्लेशांची भीति वाटते. पैसा, प्रतिष्ठा, प्राण यांच्या पलीकडे जीवनांत कांहीं तरी आहे हें त्यांना कळेनासें होतें. सामान्य माणसांना असले मोह-पाश बद्ध करूं शकत नाहींत. त्यामुळें त्यांचा आत्मविकास सहज होऊं शकतो. त्या विकासाच्या बळावरच त्यांना कुठलेंहि दिव्य करण्याची शक्ति येते राजनिष्ठेसाठीं आपल्या पोटचा गोळा बळी देण्याचें धैर्य पन्नेसारखी दाई दाखवूं शकली याचें मर्म हेंच आहे ! आपल्या श्रद्धेसाठीं हंसत मरण पत्करण्याची शक्ति सामान्य माणसांतच अधिक उत्कटत्वानें नेहमीं आढळते. त्यामुळें जीवनाचा प्रवाह विशुद्ध राखण्याचें काम थोर गणल्या जाणाऱ्या व्यक्तींपेक्षांहि त्यांच्याच हातून अधिक प्रामाणिकपणानें पार पाडलें जातें. 'जग ज्यांची न करी गणती' अशा या व्यक्तीच मानवतेचे खरेखुरे रखवालदार ठरतात.*

बुद्धदेवाच्या एका पूज्य अवशेषावर राजा बिंबिसारानें एक सुंदर मंदिर बांधलें. जणुं कांहीं त्याच्या मनांतली उत्कट भक्तिच संगमरवरी स्वरूप धारण करून उद्यानांत उभी राहिली आहे, असा तें मंदिर पाहाणाराला भास होई.

सायंकाळीं राजकन्या आणि राजवधू फुलें वहाण्याकरतां आणि आरती ओंवाळण्याकरतां त्या मंदिरांत नियमानें जात असत.

पण—

कालचक्राबरोबर सर्वच गोष्टी फिरत असतात.

बिंबिसाराचा पुत्र सिंहासनावर आला. त्यानें आपल्या पित्याला प्रिय असलेल्या धर्माच्या सर्व खाणाखुणा मानवी रक्तानें धुऊन पुसून काढल्या. त्या धर्माच्या पवित्र पुस्तकांनीं आपल्या दशवागाचा अग्नि त्यानें प्रज्वलित केला.

● ● ●

पावसाळ्यांतला सूर्य अस्ताला चालला होता. सायंकाळच्या पूजेचा समय होत आला.

राणीची दासी श्रीमती हिची बुद्धदेवावर श्रद्धा होती. पवित्र जलानें स्नान करून एका सुवर्णपात्रांत मंगल नीरांजनें आणि पांढऱ्या शुभ्र पुष्पमाला तिनें ठेवल्या. तें पूजासाहित्य हातांत घेऊन मुकेपणानें तिनें आपले काळेभोर डोळे राणीच्या मुद्रेकडे लावले.

राणी भीतीनें कांपत म्हणाली, ‘ वेडे पोरी, बुद्धदेवाच्या मंदिरांत जो पूजा-साहित्य घेऊन जाईल, त्याला देहांत प्रायश्चित्ताची शिक्षा ठेवण्यात आली आहे हें तूं विसरलीस काय ? महाराजांचीच तशी इच्छा आहे. त्यांच्या इच्छेविरुद्ध कोण वागेल ? त्यांची आज्ञा म्हणजे— ’

राणीला वंदन करून श्रीमती तिच्या महालांतून बाहेर पडली. युवराज्ञी म्हणून राजवाड्यांत जिनें नुकताच प्रवेश केला होता, त्या अमितेपुढें जाऊन ती उभी राहिली.

मांडीवर सोनेरी आरसा घेऊन आपल्या काळ्याभोर केशकलापाची वेणी घालण्यांत आणि आपल्या कपाळावरलें मंगल सौभाग्यचिन्ह रेखून रंगविण्यांत ती नववधू रंगून गेली होती.

श्रीमतीकडे दृष्टि जातांच अमितेचे हात थरथर कांपूं लागले. ती किंचाळली, ‘ माझ्यावर कसलं संकट आणणार आहेस तूं ? जा ! इथून जा आर्धो—या क्षणीं इथून चालती हो ! ’

राजकुमारी शुक्ला आपल्या महालांत खिडकीपाशीं मावळणाऱ्या सूर्यप्रकाशांत एका अद्‌भुतरम्य प्रणयकथेचें पारायण करण्यांत दंग झाली होती.

हातांत पूजासाहित्य घेऊन आलेली श्रीमती पाहतांच ती दचकली. तिच्या मांडीवरून ती प्रणयकथा गळून खालीं पडली. ती थरथर कांपत श्रीमतीच्या जवळ आली व तिच्या कानांत कुजबुजली, ‘ साहसी पोरी, मृत्यूला मिठी मारायला इतकी अधीर कां झाली आहेस ? ’

● ● ●

श्रीमती महालामहालाच्या दरवाजांतून जाऊं लागली. आपलें मस्तक उंच करून ती उच्च स्वरानें म्हणत होती, ‘ राजघराण्यांतल्या स्त्रियांनों, चला, घाई

करा. भगवान् बुद्धाच्या पूजेचा पवित्र समय जवळ येत चालला आहे. चला—चला !'

कुणी तिचे बोलणे पुरे व्हायच्या आधींच आपल्या महालाचे दरवाजे धाडकन लावून घेतले, कुणी तिला शिव्याशाप द्यायला सुरवात केली.

● ● ●

मावळत्या सूर्याचा शेवटचा किरण राजवाड्याच्या बुरजाच्या तेजस्वी कळसावर चमकेनासा झाला.

रस्त्यारस्त्यांतल्या कोपऱ्यांवर दाट छाया पसरल्या. नगरींतला कोलाहल शांत झाला. सायंकाळच्या प्रार्थनेची वेळ झाली हें शिवमंदिरांतली घंटा खण-खणून सांगूं लागली. एखाद्या गढूळ सरोवराप्रमाणें भासणाऱ्या त्या पावसाळी सायंकाळच्या काळोखांत चांदण्या चमकूं लागल्या. राजवाड्यांतल्या उद्यानाच्या पहारेकऱ्यांनीं बुद्धाच्या देवालयाकडे पाहिलें. त्यांचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना! घनदाट वृक्षराजीमधूनहि त्या मंदिरांत प्रशांतपणें प्रकाशत असलेली दीपमाला त्यांना दिसली.

' मरणाची पर्वा नसलेला कोण मूर्ख मनुष्य आहे हा ? ' असें ओरडतच आपल्या तरवारी उपसून ते बुद्धमंदिराकडे धावत गेले.

● ● ●

एका मंजुळ स्वरानें त्यांना उत्तर दिलें, ' मी श्रीमती आहे—भगवान बुद्धाची दासी—त्याची नम्र सेविका ! '

क्षणार्धात तिच्या भक्तिपूर्ण हृदयांतल्या रक्तानें तें पांढरें शुभ्र संगमरवरी मंदिर लाल लाल होऊन गेलें ! आणि त्या मंदिरांत श्रीमतीनें बुद्धदेवापुढें ठेवलेल्या नीरांजनांतली शेवटची ज्योति रात्रीच्या शांत एकांतांत अनंतांतल्या तारकांत विलीन झाली !

● ● ●

## अभ्यास

१. ' लुइ पाश्चर ' या संशोधकाची माहिती मिळवून त्याच्या जीवननिष्ठेचें वर्णन करा.

२. या कथेंतली राजकुमारी शुक्ला श्रीमतीची हकीगत सांगत आहे अशी कल्पना करून ही गोष्ट लिहा.

३. जिब्रानची ' दोन संन्यासी ' (सुवर्णकण) ही गोष्ट वाचा. ' श्रीमती ' व ' दोन संन्यासी ' या दोन्ही गोष्टींची ध्वनि-कथा (Parable) या दृष्टीनें तुलना करा.

४. लोककथा कशाला म्हणतात ? तुम्ही ऐकलेली अथवा वाचलेली एखादी लोककथा सांगा. ती परिणामकारक व्हावी म्हणून लिहितांना तुम्ही तिच्यांत काय काय फेरफार कराल ?

• • •

## पारिजातकाचीं फुलें ५

### परिचय

'शेवग्याच्या शेंगा' ही सरस कौटुंबिक गोष्ट लिहून य. गो. जोशी लघु-कथा लेखक म्हणून प्रसिद्धीला आले. मध्यम वर्गातले कौटुंबिक कलह आणि गैरसमज व रुक्ष हें इतर कुठल्याहि गोष्टीपेक्षां अधिक विकट असल्यामुळें त्या भांडणाचें आणि गैरसमजाचें होणारें निराकरण त्यांच्या अनेक गोष्टींत चित्रित झालें आहे. आईची माया, बहिणीचें प्रेम, भावजयीचा जिव्हाळा, आजीचें वात्सल्य, इत्यादि लोकप्रिय भावनांचा त्यांनीं अशा गोष्टींत मोठ्या समरसतेनें आविष्कार केला आहे. सर्व परिचित कौटुंबिक भावनांचा रसाळ-पणानें केलेला उठाव आणि स्वतःला न आवडणाऱ्या अनेक नव्या गोष्टींचा उपहास हे य. गो. जोश्यांच्या भात्यांतले प्रमुख बाण आहेत. पण या दोन गुणांशिवाय त्यांच्या लेखन-शक्तीचा आणखी एक पैलु आहे. 'पारिजात-काचीं फुलें' ही गोष्ट त्यांच्या या तिसऱ्या प्रकारच्या सामर्थ्याची द्योतक आहे असें म्हणतां येईल. या गोष्टीला बंदिस्त असें कथानक मुळींच नाहीं. एखादा लघुनिबंधकार आपल्या स्वैर विचारांच्या प्रवाहाबरोबर रमत गमत वाहत जातो ना ? या गोष्टीच्या पूर्वार्धाची रंगत थेट तशी वाटते. बोळांतल्या कोंपऱ्यावर केराच्या पेटीशेजारीं दिसणारें पारिजातकाचें झाड, त्या झाडाच्या नाजुक फुलांनीं आपल्या सुगंधानें कथेतल्या 'मी' ला घातलेली मोहिनी, इत्यादि गोष्टी वाचतांना लेखकाचा रोख कशावर आहे हें आपल्याला नक्की मुळींच कळत नाहीं. पुढें गोष्टींतल्या 'मी' च्या वाड्यात कृष्णराव नांवाच्या एका गरीब मनुष्याचें कुटुंब रहायला येतें. त्या बिऱ्हाडांतल्या अबोल, व्यव-स्थित, आणि हंसतमुख मंडळीशीं आपली ओळख होते तेव्हां कुठें आप-

त्याला कथेच्या प्रारंभींचें पारिजातकाचें झाड प्रतीकात्मक आहे याची जाणीव होते.

दरिद्री असूनहि तोंडावरलें हंसूं क्षणभरसुद्धां न मावळूं देणारी, सहा रुपयां-च्या भाड्याच्या बिन्हाडांत राहत असूनहि अष्टौप्रहर आनंदी दिसणारी, कुटुंबांतला कर्ता पुरुष सहा महिने बेकार असूनहि आपली कांहीं कुचंबणा होत आहे असें एका शब्दानेंसुद्धां दुसऱ्याला न सांगणारी या कुटुंबांतली मंडळी ही या गोष्टींतलीं खरींखुरीं पारिजातकाचीं फुलें होत. या कुटुंबाच्या समाधानी वृत्तीचें लेखकानें समरसतेनें केलेलें वर्णन हाच या कथेचा आत्मा आहे. गोष्टींत प्रत्यक्ष असें काय घडतें? कांहींच नाहीं. प्रथम कृष्णरावाचें कुटुंब गोष्टींतल्या 'मी'च्या वाड्यांत रहायला येतें. पुढें कृष्णरावाची नोकरी जाते. ती गेल्यावर सहा महिन्यांनीं त्याला परगांवीं नोकरी मिळते. त्या कुटुंबांतली मंडळी घरमालकाचा निरोप घेऊन निघून जातात. या काळांतलें त्या कुटुंबांतल्या मंडळींचें आनंदी जीवन पाहून आणि साहजिकच त्याची स्वतःच्या आणि इतरांच्या अकारण असंतुष्ट व लहानसहान कारणांसाठीं चोवीस तास चिरचिर करणाऱ्या आयुष्यक्रमाशी तुलना करून या 'मी'-च्या मनांत जे विचार उत्पन्न होतात त्यांनीच या कथेचा मुख्य भाग व्यापला आहे. दोन परस्परविरोधी चित्रें एकमेकाशेजारीं ठेवून विशिष्ट परिणाम साधण्याचें कुशल कथा-लेखकाचें जें एक कसब असतें तें या गोष्टींत जोश्यांनीं प्रगट केलें आहे. ही गोष्ट वाचून संपविल्यावर तीस रुपयांची कार-कुनी करीत असूनहि हंसतमुखानें कालक्रमण करणारा कृष्णराव आणि त्याच्या इतकीच समंजस व संयमी असलेली त्याची बायकामुलें यांना आपण विसरूं शकत नाहीं. हीं माणसें मोठी बुध्दिवान नसतील, त्यांच्या अंगीं अचाट कर्तृत्व नसेल! जगाला चकित करून सोडणारा कोणताहि गुण त्यांच्या ठिकाणीं आपल्याला आढळणार नाहीं. पण असें असूनहि त्यांच्या एका गोष्टीचा आपल्याला अगदीं हेवा वाटतो. ती गोष्ट म्हणजे त्यांच्यापाशीं असलेली समाधानाची संपत्ति ही होय. अशीं माणसें जगांत पुष्कळ असा-वीत. त्यांतलीं थोडीफार आपल्याला आयुष्याच्या प्रवासांत भेटावींत, तीं आपल्या अगदीं जवळ यावींत, असें मनाला वाटूं लागतें. कारण त्यांनीं

*आपल्या वर्तनानें एक गोष्ट सिद्ध करून दाखविली आहे. ती म्हणजे सुखाचा खरा झरा माणसाच्या मनांत असतो ही होय. त्याचें मन निकोप, विचारी आणि संयमी असेल तर तो प्रतिकूल परिस्थितींतहि सुख निर्माण करून घेऊं शकतो, हें कृष्णरावाच्या कुटुंबाच्या चित्रणातून सूचित केलें गेलेलें या कथेंतलें तत्त्वज्ञान दुबळें किंवा दैववादी नाहीं. तें अंतर्मुखतेचें तत्त्वज्ञान आहे. त्यामुळेंच कुठल्याहि भावनेचा कृत्रिम, सांकेतिक किंवा अतिरंजित आविष्कार न करताहि या गोष्टींत लेखकानें गोडवा निर्माण केला आहे.*

प्रत्येकालाच अनुभव असेल असें जरी म्हणतां येत नाहीं तरी माझा मात्र अनुभव असा आहे कीं, मनाला एखाद्या वेळीं कमालीचा आनंद झाला, कीं त्याच वेळेला माझ्या मनाला कसली तरी हुरहुर लागते ! आणि अशी हुरहुर लागली म्हणजेच माझ्या मानसिक आनंदाचा जास्त विकास होतो !

किती हि सुंदर घर बांधलें तरी त्याला जशी बाहेरची हवा आंत येण्याकरितां खिडक्या या हव्यातच, त्याप्रमाणें आनंदाच्या हवेल्यांना 'हुरहुर' वाटायला लावणाऱ्या खिडक्या असल्या तरच त्या आनंदाला गंमत येते !

लहानपणीं मी आपल्या वडिलांना अत्यंत निष्ठुर समजत असें ! याला कारण मात्र अत्यंत क्षुल्लक होते ! माझ्या वहिणी सासरहून माहेरीं आल्या किंवा माहेरून सासरीं परगावीं चालल्या, कीं माझे वडील त्या वेळीं घरातून उठून हमखास बाहेर जायचे ! आणि यावरूनच मी त्यांना निष्ठुर समजत असें ! पण आतां वाटतें, ती त्यांच्या मनाची एक हळवी तऱ्हा असावी ! सुखाचेहि साक्षीदार व्हायला नको आणि वियोगाचेहि भागीदार व्हायला नको !

भुकेच्या पहिल्या तोंडीं जी अन्नाला गोडी असते ती अर्धे जेवण झाल्यावर राहत नाहीं. त्याप्रमाणेंच माझें झालें होतें. माझें वय आज सुमारें चाळीस वर्षांचें होतें. सर्व तऱ्हेच्या सांसारिक सुखाशीं माझा परिचय झाला होता. जरी त्या सर्व सुखांचा सहवास मला अद्याप हवासा वाटत होता तरी त्यांतील नावीन्य नाहींसें झालेलें होतें ! क्वचित् एखाद्या वेळीं आपलें आयुष्य आतां उतरणीला लागलें आहे अशीहि मनांत कल्पना येऊन जाई आणि मनाला हुरहुर लागे !

नुकतेंच मी आपल्या थोरल्या मुलीचें लग्न केलें होतें. त्या वेळेलाहि मनाला आनंद वाटला; पण सहज मनांत अशी कल्पना आली—

एखादा दोरा रिळाला गुंडाळावा आणि दोरा पूर्ण गुंडाळल्यानंतर तो पुन्हां उलगडीत बसावें त्याप्रमाणें जीं जीं सुखदुःखें मी भोगिलीं त्यांचें आतां परावर्तन होत आहे !

सुमारें सतराअठरा वर्षांपूर्वींची गोष्ट. ज्या समारंभानें मीं आपल्या मुलीचें आज कन्यादान केलें, तशाच समारंभानें सतराअठरा वर्षांपूर्वीं मीं एका मुलीचें दान घेतलें—जिला मी आज अभिमानानें आपली अर्धांगी समजतों. पण मनुष्याची मोठेपणाची कल्पना कांहीं और असते ! त्या वेळेला कन्यादान घेताना त्या वेळची माझी स्वतःची भूमिका मी अलौकिक अभिमानास्पद समजत होतों. आणि आज स्वतःच्या मुलीचें कन्यादान करतानाहि माझ्या आजच्या भूमिकेचें महत्त्वहि मला अलौकिक वाटत होतें व आहे !

त्या वेळेला स्वतःला सर्वसुखाचा राज्याभिषेक होत आहे अशा थाटानें माझी वृत्ति रंगली होती आणि त्या वेळीं माझ्या सासऱ्याला—वधूपित्याला—एखाद्या भटजीसारख्याच योग्यतेनें मी पाहात होतों !

पण आज वधूपिता ही भूमिका मला स्वतःला प्राप्त होतांच माझी कल्पना बदलली ! आज मला वाटत होतें, सुंदर वनश्रीनें विनटलेल्या एखाद्या उंच डोंगरावर जाऊन एखादा तपस्वी ज्याप्रमाणें सूर्याला अर्घ्यदान देतो त्याप्रमाणें मी स्वतःला आज संसारी तपस्वी समजत होतों ! आणि त्या तपस्व्याच्या थाटांतच मीं आपलें कन्यादान केलें आहे !

माझ्या घरातील लग्नसमारंभ पार पडला होता. पाहुणे मंडळी निघून गेली होती. पुन्हां सर्व स्थिरस्थावर झालें !

वेळ संध्याकाळची होती.

नेहमींच्या सरावाप्रमाणें मला एक कसलीशी जिन्नस पाहिजे होती. ती मी माझ्या मुलीला हांक मारून मागितली. पण लगेच लक्षांत आलें कीं, ती आतां घरीं नाहीं—आजपर्यंत माझ्या घरांत वाहणारा तो जीवनौघ दुसऱ्या वाटेला लागला आहे !

माझ्या बायकोनें विचारलें, " काय पाहिजे ? "

आतां मला कांहींच नको होतें. आम्ही एकमेकांकडे पाहून विरागीपणानें

हंसलों. कांहीं वेळानंतर निःशब्दपणानें वावरत आम्हीं आपलें जेवण उरकलें. मनाच्या त्या गोड उदासीनतेंतच मीं अंगांत कपडे चढविले, हातांत काठी घेतली आणि बाहेर पडलों.

रात्रीच्या नवांचा सुमार होता. तेव्हांपासून रात्रीं दोन अडीच वाजेपर्यंत मी भटकत होतों. तीनचे सुमारास मी परत घराकडे वळलों. घर जवळ आलें तेव्हां हातांतील काठीनें सडकेशीं खेळत, कधीं काठी फिरवीत असा मी चालावला लागलों. चांदण्याच्या जोडीला थोडी थंडीहि पडली होतीच.

माझें घर थोडेंसें आडबाजूला पण बोळांतच होतें.

मी बोळाच्या कोपऱ्याशीं आलों तोंच —

मधुर सुवासानें आजूबाजू दरवळून गेलेली मला आढळली ! जमिनीवर पडलेला सूर्यप्रकाश अगर चंद्रप्रकाश पाहून जसें आपण सहज त्याचें उगमस्थान म्हणून सूर्याकडे अगर चंद्राकडे पाहातों त्याप्रमाणें त्या अदृश्य, मधुर सुवासाचा जनक चंद्र–सूर्य कोठें आहे तें मी पाहूं लागलों. शेजारीच कोपऱ्यावर केराची पेटी होती आणि त्या पेटींत व तिच्या सभोंवतालीं पारिजातकाच्या फुलांचा तुरळक सडा पडला होता. सहज वर नजर गेली फुलांचा शेला पांघरून पारिजातकाचें झाड डौलानें उभें होतें ! आणि जेव्हां डौलानें तें पारिजातकाचें झाड डुले त्या वेळीं त्याच्या त्या शेल्यातील कित्येक फुलें खालीं पडत. म्हणून तो पुन्हा त्वेषानेंच एकदा फांदी हलवी; तरीहि तोच प्रकार !

मला त्या विरोधी दृश्याची गोड गंमत वाटली खालीं कचऱ्याची पेटी वर पारिजातकाचें झाड ! मी त्या दृश्यानें भारून गेलों होतों. त्या वेळीं माझ्या डोक्यांत कसलीच कल्पना येऊं शकत नव्हती ! उडणारी कापसाची म्हातारी धरण्याचा हव्यास केला तर लहान मुलांना फक्त मेहनत होते; पण ती म्हातारी कांहीं त्यांच्या हातीं लागत नाहीं. म्हणून मी मनात विचार केला, नुसती ही आनंदाची झुळूक अनुभवायची ! त्याबद्दलची मला कांहींहि कल्पना आली नाहीं तरी चालेल.

पण रस्त्यांतच मला असें किती वेळ उभें राहतां येणार ? हातांतली काठी खांद्याच्या खुंटीवर अडकवून व खालीं वांकत कविवर्य तांब्यांचे

**कुस्करूं नका हीं सुमनें !**

**अंजली भरुनि अर्पिलीं । भक्तिनें दिलीं म्हणुनि तरि घेणें**

## जाइजुई, बकुलही उरि हाति। हीहि असूं देणें
## कुस्करूं नका ही सुमनें!

हे काव्यचरण गुणगुणत मी ती कचऱ्याच्या पेटीजवळची पारिजातकाची फुलें गोळा करूं लागलों!

अशी जवळ जवळ ओंजळभर फुलें मी गोळा केली आणि पुढें बाहेर कुठेंच न जातां घरीं परतलों. ती फुलें टेबलावर ठेवली आणि त्यांकडे पहात खुर्चीवर बसलों आणि तसाच झुंगलों!

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी जो जागा झालों तो वाड्यांत दोन बिऱ्हाडकरूंमध्यें चाललेल्या भांडाभांडीमुळें! माझ्या वाड्यांत असलेलीं बिऱ्हाडें जरा तऱ्हेवाईकच होतीं. कोणाच्या कशाबद्दल तरी कांहीं कारणांमुळें नेहमीं तक्रारी चाललेल्या असायच्याच!

आणि तसें पाहिलें तर माझी पैशाच्या दृष्टीनें स्थिति जरी चांगलीच समाधानकारक होती तरी माझ्या घरांत शांतता यथातथाच असे! कांहींतरी कुरकुर-धुसफूस ही असायचीच!

तेच शेजारी-पाजारी म्हणून मीहि आहे त्या स्थितींत आनंद मानून होतों.

माझा स्वभाव अत्यंत शांत होता! चूक कुणाचीहि असो, माझी आपली पडतें घ्यायची तयारी असायची! पण या माझ्या वागणुकीचा अर्थ भलताच होई! कुणी मला अजागळ समजे! कोणी भेकड समजे! माझ्या हृदयांतला जळजळीतपणा प्रत्यक्ष माझ्या बायकोलासुद्धां फारसा समजलेला नव्हता; मग इतरांची कथा काय?

मी मात्र माझ्याभोंवतीं असलेल्या प्रत्येक व्यक्तीला पूर्णपणें ओळखून होतों आणि होई काय-मी त्या व्यक्तीला त्याच्या खऱ्या स्वरूपांत ओळखतों आहें हें प्रसंगविशेषीं जर त्याला कळलें तर त्याची त्रेधा उडे, त्याला संताप येई आणि मी जरी तो प्रसंग विसरून गेलों तरी तो मात्र त्या प्रसंगाची तेढ मनांत ठेवी आणि बहुतेक त्याचें माझें नंतर वितुष्टच येई! जे फाजील संभावित असत ते जर त्यांचें माझ्याकडे कांहीं काम असलें तर पुन्हां हस्तिदंती नमस्कार करायला लागत! माझी अशा प्रसंगाला सदाच तयारी! पण ते महात्मे मात्र त्यांचें काम झाल्यानंतर पुन्हां संगमरवरी होत आणि चुकून मी जर सलगीचा शब्द ?।कला तर आपल्या कुचकेपणाची अशी नांगी मारीत—पण—पण—

—असलें हलाहल मी पुष्कळ प्यालों होतों आणि पचवूंहि शकत होतों !

—माणसांच्या अशा कांहीं विचित्र जाती मी पाहिल्या आहेत कीं, आपली किंमत विसरून त्यांच्याशीं सलगीनें वागण्याचा प्रयत्न करा, ते तुमचें खेळणें खुळखुळा करून टाकण्याचा प्रयत्न करतील ! तुम्हीं त्याना लाथेची ठोकर उगारा—आपली किंमत यानें आतां बरोबर ओळखली हें जाणून ते तुमच्या पायां पडूं लागतील !

मनुष्यस्वभावाच्या असंख्य तऱ्हा असणार ! तिथें [illegible]न, वर्णन करून किती दाखविता येणार ?

माझ्या वाड्यांतील एक बिऱ्हाडकरू नुकतेंच बिऱ्हाड सोडून गेलें होतें. ती जागा अद्याप रिकामीच होती. मुलीच्या लग्नामुळें माझ्या मनाला-घराला-पत्नीला व इतर चिल्यापिल्याना लागलेली गोड हुरहुर अद्याप कमी झालेली नव्हती ! कधीं चार दिवस विसर पडतोसा वाटावें तोंच फोनोग्राफची किल्ली संपल्या-बरोबर आपण लगेच किल्ली देऊन दुसरी प्लेट लावतों त्याप्रमाणें फट्कन माझ्या मुलीनें सासरहून यावें. त्यामुळें आमच्या मनाच्या फोनोग्राफला पुन्हां किल्ली दिल्याप्रमाणें व्हावें. पण आमच्या फोनोग्राफवर मात्र 'गोड हुरहुरीची' एकच प्लेट लागत होती ! त्यांतच त्या पारिजातकाच्या झाडानें मला वेड लावलें होतें. मी रात्रीं येरार्धीच उठून कोंपऱ्यापर्यंत जाई आणि त्या पारिजातकाकडे पहात उभा राही. त्याच्या सुगंधानें—नाजुक सुगंधानें मला वेड लावलें होतें. पण हळूहळू पारिजातकाचा 'बहर' संपत आला. झाडावर फुलें कमी कमी येऊं लागलीं. बिचारा पारिजातकहि मला उदासीन भासूं लागला !

माझी मुलगी सासरीं गेली होती !

पारिजातकाचीं फुलें नाहींशीं झालीं होतीं !

आमच्या वाड्यांतील बिऱ्हाडाची रिकामी झालेली जागा अद्याप रिकामीच होती !

एक दिवस सुमारें तीस वर्षांचा इसम जागा पाहाण्याकरितां आला. त्याला जागा पसंत पडली. 'घरीं दाखवतों आणि मग सांगतों आपल्याला काय तें' असें सांगून तो घराबाहेर पडला. दुपारीं बायकोला आणून त्यानें जागा दाख-विली. जागा दोघांनाहि पसंत पडली !

त्या दांपत्यानें माझ्या मनावर पहिल्या भेटींतच विलक्षण मोहिनी घातली !

" काय भाडं आहे या जागेचं ?" त्यानें प्रश्न केला.

माझ्या मनांत त्या दांपत्याविषयीं लोभ उत्पन्न झाला होता. मला वाटलें, मी सांगितलेलें भाडें यांना पटलें नाहीं तर हें बिऱ्हाड कांहीं माझ्या घरी येणार नाहीं. आणि मला तर तें बिऱ्हाड माझ्या वाड्यांत यायलाच पाहिजे होतें. मी भाड्याची एवढी फिकीर कधींच करीत नव्हतों. जास्त भाड्याच्या आशेनें वाटेल त्या ठिकाणीं दुकानाच्या फळ्या लावून तेथें ' हेअर कटिंग सलून ', ' शू-मेकर ' वगैरे स्नेही-सोबती आपल्या वाड्यांत जमा करणें मला आवडत नव्हतें. म्हणून माझी जागा अद्याप रिकामी राहिलेली होती !

बिऱ्हाड हातचें जाऊं नये म्हणून मींच त्यांना विचारलें, " हल्लीं राहतां तिथें आपल्याला काय भाडं आहे ? "

" सहा रुपये ! " त्यानें उत्तर दिलें.

" जागा पसंत आहे ना तुम्हांला ? या जागेचेंहि भाडें सहा रुपयेच आहे." मीं म्हटलें

त्या गृहस्थानें तावडतोब सहा रुपये माझ्या हातावर ठेवीत म्हटलें, " पहिला महिना आहे म्हणून आगाऊ भाडें देत आहे. दर महिन्याला आगाऊ भाडें देतां येणार नाहीं. महिना भरतांच दहा तारखेच्या आंत आपलें भाडें आपल्याकडे पोंचतें होईल. मागण्याची जरूर कधींच पडणार नाहीं." मी तें कबूल केलें. भाडें घेतलें. त्या गृहस्थाला पावती दिली.

ती तारीख अठ्ठावीस होती.

आणि ते पहिल्या तारखेपासून आमच्या वाड्यात राहायला येणार होते !

पहिल्या तारखेला ती मंडळी वाड्यांत राहण्याकरितां आली. त्या कुटुंबांत माणसें एकंदर पांच. नवरा-बायको, एक मुलगी आणि दोन मुलगे. थोरली मुलगी होती तिचें वय अकरा वर्षांचें होतें आणि अगदीं लहान मुलगा होता त्याचें वय फक्त सहा महिन्यांचें होतें. त्यांचें सामानसुमान बेतावाताचेंच पण आटपशीर व व्यवस्थित होतें. सकाळपासून त्यांचें सामानसुमान पहिल्या बिऱ्हाडाहून आमच्या वाड्यांत येत होतें. तेवढीच कायती ये-जा. सर्व सामान आल्यानंतर त्यांच्या बिऱ्हाडाचें दार लागलें गेलें. आंत माणसें आहेत ही चाहूलसुद्धा बाहेर लागेना ! मला नवलच वाटलें. अहो, तीन मुलें म्हणजे माझ्या मुलां-

वरून पाहतां तीन गजराचीं बाळ्याळेंच ! गप्प कशी बसली ? वाटलें, नव्या बिऱ्हाडामुळें असेल ही फसवी शांतता !

असे चारसहा दिवस गेले; पण या चारसहा दिवसांतहि नव्या बिऱ्हाडांतील माणसें पाहाण्याकरितां इतर बिऱ्हाडकरूंना व माझ्या घरच्यांहि माणसांना टपून बसावें लागे !

वायकाबायकांत पहिली ओळख व्हायची म्हणजे नळावर अगर पाणी भरण्याच्या ठिकाणीं ! पण या नव्या बिऱ्हाडांतील माणसांना आंघोळी व पाणी भरणें सकाळीं सहा साडेसहाच्या आंतच व्हायचें कीं ज्या वेळेला इतर बिऱ्हाडांतील बायकामाणसें जांभया देत उठून बाहेर यायचीं !

" माणसें मोठीं कुऱ्यांचीं आहेत हो ! " असें नवीन बिऱ्हाडकरूंविषयीं सर्वत्रांचें मत झालें !

पुढें आठदहा दिवसांनीं कुणालासा एक अलौकिक शोध लागला, " अहो, फुकटचाच कुरा आहे हो ! हाताला पाटलीसुद्धां नाहीं आहे त्या बाईच्या ! "

पुरुषापुरुषांमध्यें असें ठरलें कीं, त्या नवीन बिऱ्हाडांतला पुरुष ' माणुसघाणा आहे ! माणसांत मिसळायला नको. मग अशी भरलेल्या वाड्यांत कशाला जागा घेतली. गांवाबाहेर एखादा स्वतंत्र बंगला तरी घ्यायचा होता किंवा स्मशानाच्या बाजूला रहायला जायला पाहिजे होतें. अशा तऱ्हेनें जो तो नवीन बिऱ्हाडकरूबद्दल आपआपलें मत बनवीत होता.

पण माझ्या मनांत मात्र त्या माणसांविषयीं एक अभिनव कुतूहल निर्माण झालें होतें ! हीं माणसें आहेत तरी काय जातीचीं ?

हीं माणसें इतकीं बिनबोलकीं कशीं ?

बरं, मोठ्या माणसांचें राहो, लहान मुलेंसुद्धां ?

मोठ्या माणसांचाच संसार असला तर अभिमान चालवतां येतो; पण संसारांत लहान मुलें आलीं कीं केव्हां तरी अभिमान सोडायची वेळ येते ! अहो, बोलूनचालून बालसृष्टि ! आपपरभाव अजिबात नाहीं आणि बाळहट्टापुढें कुणालाहि नमावेंच लागतें—आणि त्यामुळें एखादे वेळीं अभिमानहि सोडावा लागतो !

पण त्या बिऱ्हाडांतल्या मुलांची स्थिति तशी नव्हती ! तीं लहान मुलेंहि आईबापांच्या नजरेच्या धाकांत होतीं ! नाहीं तर पुष्कळ ठिकाणीं आपण पाहातोंच—आपलें लहान मूल अगोदर दुसऱ्याच्या घरीं जाऊं द्यायचें. तिथें

कोणी खात असेल तर सहजच मुलाच्याहि हातांत खाऊ ठेवतातच. एवढें झाल्यानंतर मग त्या मुलाच्या आईनें अगर मोठया बहिणीनें धांवत धांवत यायचें व मुलाला रागवायचें–त्याला मारीत घरीं न्यायचें किंवा " हं, त्याच्या हातावर कांहीं खायला देऊं नका हं. " म्हणून गस्त घालीत सुटायचें, अशी रीत असते! पण त्या बिऱ्हाडातलीं मुलें अगोदर कुणाच्या घरीं जायचींच नाहींत. मुद्दाम बोलावून नेलीं तरी खाण्याचे पदार्थ घ्यायचीं नाहींत! अशी मुलें लाभणें हें एक मोठें नशीबच आहे!

त्या बिऱ्हाडांतल्या माणसांच्या चेहेऱ्यावरहि एक आश्चर्यकारक गंमत होती. सर्वांच्या तोंडावर कायम छापाचें 'स्मितहास्य' नेहमींच असे!

कुठला आनंद पैदा केला त्यांनीं एवढा?

सदा हंसण्याच कुणीं शिकविलें त्यांना?

आणि त्या अगदीं लहान सहा महिन्यांच्या मुलालासुद्धां! बेटा गुलाम रडतांना कधीं ऐकायलाच यायचा नाहीं!

त्यांच्याकडे कुणीं फारसें येतजातहि नसे. क्वचित् आठपंधरा दिवसांनीं कुणी-तरी यायचें!

त्या बिऱ्हाडांतल्या माउलीचें नांव होतें यशोदाबाई!

आपली घरांतल्या घरांत सदा असायची; कथाकीर्तन नाहीं, पुराण नाहीं–कधीं नाटक-सिनेमा नाहीं! आधुनिक विचारांची झळ तिला लागलेली नसावी! स्त्री-स्वातंत्र्यविषयक विचारांचा धुडगूस तिच्या ऐकिवांत नसावा बहुतकरून! आणि शिवाय आनंदांत? हिंदु असून? स्त्री असून? काय आश्चर्य आहे!

आणि तिचीं मुलें? आहाहा! जशीं टवटवीत फुलें! नाजुकपणाच्या अर्थानें नव्हे बरें का? सतेजपणाच्या दृष्टीनें; आणखी तब्बेतीनें ठणठणीत! एरवीं असा हंसरा चेहरा आणतात कुठून? असा सर्वत्र आनंदी आनंद होता!

—आणि शिवाय तीं एकाद्या आय्. सी. एस् चीं मुलें नव्हतीं! शिशुसंगो-पनांत वाढलेलीं नव्हतीं, त्यांचें कधीं वजन केलेलें नव्हतें, मेलिन्स फूड त्यांनीं कधीं खाल्लेलें नव्हतें! थोडक्यांत सांगायचें म्हणजे 'संतति व ती कशी वाढ-वावी'–एकाच शब्दांत सांगायचें म्हणजे त्यांचें जीवन नैसर्गिक होतें. शास्त्रा-धारें–कलाधारें उत्पन्न झालेले–केलेले–ते पुतळे नव्हते!

—त्या बिऱ्हाडांतल्या माणसाचें नांव कृष्णराव! आनंदाची प्रतिमा! समा-

धानाची मूस ! आरोग्याचें व नियमितपणाचें मूर्तिमंत दर्शन ! तो कधीं वाद-विवाद करीत नसे ! तो चळवळींत कोणच्याच नव्हता ! पण कपडे खादीचेच होते. घरांतील सर्व सामान देशीच निवडलें जाई ! पण एक दिवस मीं त्यांना विचारलें, "कां हो कृष्णराव, तुम्ही स्वदेशीचे अगदीं कट्टे पुरस्कर्ते दिसतां ?"

उत्तर देण्याच्या ऐवजीं तो फक्त हंसलाच ! आणि फक्त एकच वाक्य बोलला, "हातानें होईल तेवढें करावें !" नंतर मी त्याची चवकशी केली. मला वाटत होतें हा कुठेंतरी शाळामास्तर असेल म्हणून; पण चवकशीअंतीं कळलें कीं, तो म्युनिसिपालिटींतला वसुलीकारकून होता ! त्याला पगार फक्त तीस रुपये होता !

देशात केवढ्या धडामोडी घालल्या होत्या; पण त्या त्याच्या तोंडून कधींच ऐकायला मिळाल्या नाहींत! मला वाटलें, काय विचित्र माणसें ! सुख-दुःखाच्या सीमारेषेवरचे रखवालदार का आहेत हे ? कसें यांना जमतें हें सगळें ? किती जन्मांची तपश्चर्या ही ? इतका सात्त्विक आनंद, इतकी समाधान-वृत्ति कुठून मिळविली त्यांनीं ? आणि एवढ्या गरिबीच्या आयुष्यक्रमांत त्यांना ती टिकवतां कशी आली ?

अशान सुमारें आठदहा महिने गेले. सृष्टीमध्येंहि हवामानाचा बदल होऊन पावसाळा, हिंवाळा येऊन गेला; पण त्या घरात एकसारखा वसंतकालच दिसत होता. मीं म्हटलें, "किती आदर्श जीवन आहे हें !" पण मला तें कसें मिळविता येणार ?

त्याच्याशीं कधींहि बोलण्याचा प्रयत्न करा. "हं !" "बरं" "तसंच" वगैरे शब्दच बाहेर पडत. कधीं गृहस्थ अघळपघळ बोलला आहे, शक्य नाहीं ! मोजक्या प्रश्नावर मोजकीं उत्तरें ! मी आश्चर्यानें थक्कच होई !

काय अलौकिक आत्मसंयमन हें !

पैशाच्या बाबतींत माझें जीवन सुखी होतें. पण खरें सुख मला त्यांत कधींच लाभलें नाहीं ! अगोदर कोणत्याहि गोष्टींत माझ्या घरांत एकमत व्हायलाच कठीण पडे—कधीं त्याच्यांतच व्यक्तिस्वातंत्र्याचा प्रश्न उद्भवे. नाना तऱ्हा ! आमचें जीवन बौद्धिक व वादविवादात्मक होतें, त्यामुळें आमच्या सुखाची गाय आमच्या अंतःकरणाच्या गोठ्यांत सुखानें सांवलीला बसलेली क्वचितच आढळे ! नेहमीं हिसकाफिसक चाललेली आणि दावें तोडण्याच्या उत्यारींत

असलेली ! नेहमींच धांवपळ आणि उसासे ! या माझ्या जीवनांतहि वैचित्र्य आहे, सुखाभास आहे; पण खरें सुख नाहीं ! नैसर्गिक पचन होणें निराळें आणि सोडा वाटरचें पाणी पिऊन पचन करविणें निराळें—त्याप्रमाणें आमचें सुख परावलंबी होतें ! आम्ही सुखी आहोंत म्हणून आम्हांला ओरडून सांगावें लागत होतें !

मूळचें सौंदर्य नसलेल्या एखाद्या नटव्या स्त्रीनें अलंकाररहित पण खऱ्या सौंदर्यवान स्त्रीला पाहिलें म्हणजे ती जशी खजील होते व त्या खऱ्या सौंदर्यवान स्त्रीकडे किंचित् लोभीपणानें, किंचित् मत्सरानें पाहूं लागते, त्याप्रमाणें माझें झालें होतें ! माझ्या घरांत सुखाचे, विलासाचे देखावे होत. ‘ वेल कम्—सुस्वागतम् ’ च्या पाट्या होत्या ! “ असे शांतता ज्या घरीं, तेथें लक्ष्मी वास करी !” ही पाटी तर आमच्या वादविवादाच्या खोलींतच लावलेली होती; पण—पण तो सर्व देखावा. कागदाचीं फुलें ! विलायती सेन्टस् ! अंतरीचा सुवास त्यांत दरवळत नव्हता ! तें सांचविलेलें पाणी होतें—त्या पाण्यांत जिवंतपणा नव्हता !

त्यामुळें मला त्या बिऱ्हाडकरूचा सात्त्विक हेवा वाटूं लागला !

अशांत दोनतीन महिने गेले. एक दिवस कृष्णराव—तो सुखी माणूस—दुपारीं घरींच दिसला म्हणून मीं सहजच विचारलें, “ काय हो कृष्णराव, आज घरींचसे ? ” त्यांनीं हंसत हंसत उत्तर दिलें, “ नोकरी सुटली आजपासून ! ”

तें ऐकून मला खरें वाईट वाटलें ! पण किंचितसा आनंदहि झाला.

आतां याच्या जीवनांत मला कांहीं तरी चलबिचल पाहायला सांपडेल !

मी त्या पारिजातकाच्या झाडाला अलीकडे विसरलोंच होतों !

पण त्यांच्या आयुष्यांत चलबिचल पाहण्याचा योग मला आला नाहीं ! सहा महिने गेले असेच ! पण त्यांचें जीवन पूर्वी सारखेंच चाललें होतें ! फरक एवढाच पडला होता कीं, ऑफिसच्या वेळेला कृष्णराव जे घरांत नसायचे ते आतां घरींच सांपडत होते !

सहा महिने नोकरीशिवाय रिकामे गेले तरी घरांत कांहीं भांडणें, त्रागे किंवा एखाद्या पदार्थाची वाण दिसली नाहीं ! वाणचें तें सामान वेळेवर येत होतें !

सहा महिन्यांत एकहि गृहस्थ त्यांच्याकडे पैसे मागायला अगर उधार-

वसुलीला आला नाहीं! मी मनांत म्हणे, 'काय अद्भुत जादु आहे या गृहस्था-जवळ ? कोणता कल्पवृक्ष सांपडला आहे यांना ?'

त्यांना कोणता कल्पवृक्ष सांपडला आहे याचा शोध मला लागला नाहीं; पण माझ्या घरांतला कल्पवृक्ष लवकरच माझ्या हातून जाणार होता !

एक दिवस कृष्णराव माझ्याकडे आले. मला वाटलें, या गृहस्थाला कांहीं कर्जाऊ रक्कम पाहिजे असेल ! कारण त्यांची नोकरी सुटल्यावर पैशाची मदत लागल्यास मी देईन असें मीं त्यांना आपण होऊनच सांगितलें होतें ! म्हणून मला वाटलें, ते पैसे मागण्याकरितांच आले असतील; पण त्यांनीं माझ्याजवळ पैसे मागण्याच्या ऐवजीं मला देण्याकरिताच पैसे आणले होते ! एक महिन्याचें भाडें माझ्यापुढें ठेवीत कृष्णराव म्हणाले, "मला परगांवीं नोकरी लागली आहे. मी येत्या पहिल्या तारखेला जागा खालीं करणार आहें !"

मी आश्चर्यानें थक्क होऊन त्याच्या चेहऱ्याकडे पाहात राहिलों ! पण त्या सद्गृहस्थाच्या चेहऱ्यावर कांहींच चलबिचल नव्हती.

ठरल्याप्रमाणें त्या महिन्याअखेर तो गृहस्थ जागा सोडून गेला ! जातांना कृष्णरावांची बायको यशोदाबाई माझ्या घरून हळदी-कुंकू घेऊन बाहेर पडली ! मी त्याच्याकडे, कृष्णरावांकडे व त्यांच्या मुलांकडे पाहातच राहिलों ! जें हंसें तोंडावर घेऊन ती मंडळी आमच्या वाड्यांत राहायला आली होती तेंच हंसें बरोबर घेऊन तीं सर्व माणसें निघून गेलीं !

मी मात्र त्यामुळें फारच उदासीन झालों !

तीं माणसें गेल्यानंतर मी आपल्या दिवाणखान्यांत ईझिचेअरवर विचार करीत बसलों होतों ! "काय जातीचीं माणसें आहेत हीं ? माणसें कसलीं, हीं फुलें आहेत ! पारिजातकाचीं फुलें आहेत ! पारिजातकाच्या सुकुमार पण नाजुक फुलांप्रमाणें यांचें आयुष्य नाजुक आहे ! त्यांचें सौंदर्य सात्त्विक आहे ! या जगाच्या अवाढव्य घडामोडींत यांचें कार्य काय ? आजूबाजूला समाधानाची फुंकर मारायची ! किती साधें पण किती निष्पाप जीवन आहे हें ! असें जीवन मला कधीं मिळेल का ? त्यांच्यासारखें मला कधीं हंसतां येईल का ?" मीं मनांत म्हटलें, "देवा, असें कोणत्याहि परिस्थितींत कायमचें हंसायला तूं जर मला शिकविशील तर—तर त्याच्या मोबदला माझें घर, संपत्ति, बायकापोरें सर्व घेऊन

जा, पण मला असें हंसायला शिकीव ! त्या हंसण्यांतच श्रीमंती आहे, सुधारणा आहे, सर्व कांहीं आहे ! देवा, या पारिजातकाच्या फुलांचा सहवास तूं मला आणखी कां घडूं दिला नाहींस ? " मी उदासीनतेंतच बाहेर पडलों. पूर्वीचें पारिजातकाचें झाड माझ्या दृष्टीस पडलें !

त्या पारिजातकाच्या झाडाला आतां बहर आलेला होता ! मीं म्हटलें, " माझ्या घरांतला पारिजातक गेला आणि आतां हा फुलला ! "

अजूनहि वेड्यासारखीं त्या पारिजातकाचीं रस्त्यांत पडणारीं फुलें मी रोज नेमानें वेचून आणीत असतों !

• • •

